# प्रस्तावना

गेल्या सात पुस्तकांत पुरुषाचे धर्मकर्मांचा विचार केला, स्त्रियांचीं धर्मकर्में यांचा पण पुष्कळ ठिकाणीं यांत समावेश झाला आहे पण मुलींच्या शाळा निराळ्या असल्यामुळें त्या शाळांत शिकविणें साठीं स्त्री-धर्माचें विवेचन करणारें एक पुस्तक पाहिजे ह्मणून हें पुस्तक केलें आहे. यांत पुरुषांचें धर्माव्यातिरिक्त स्त्रियांचेच असें जे विशिष्ट धर्म आहेत त्यांचें विवेचन केलें आहे स्त्रियांनी पुरुषांची धर्मकर्माची पुस्तकें इतर धर्मांची मिळविणेंसाठीं वाचावींत, स्त्रियांचें विशेष तितकेंच या पुस्तकांत सांगणेंत आले आहेत, परमेश्वर कृपेनें शाळांतून धर्मशिक्षण द्यावें असें ठरलें व मुलींच्या शाळांतूनही पुस्तकें शिकविण्याचें पण ठरलें तर पुरुषांचें पुस्त-कांतील स्त्रियांना अवश्य विषय काढून तें या पुस्तकांत सामिल करून निराळीं पुस्तकें करतां येतील.

या पुस्तकांचे दहा भाग केले आहेत तें खालीं लिहिलें प्रमाणें.

१ नित्यकर्में—रोज करावी लागणारी कामें.

२ ऋण—वार्षिक करावयाची कामें.

३ संस्कार—जन्मांत एकवेळीं करावी लागणारीं कामें.

४ निषेध—ज्या गोष्टी केव्हांही करूं नयेत त्या.

५ भजन—परमेश्वरी सेवा करणेचे मार्ग,

६ व्रतें—आपलें मन सुधारण्याचें उपाय.

७ तीर्थयात्रा—तीर्थांचें ठिकाणची कर्तव्यें.

८ विधवाव्रत—विधवांचें आचार कसें असावेत.

९ कारभार—स्त्रियांनी कारभारांत कसा भाग घ्यावा.

१० लोकोपयोगी कामें—स्त्रियांनां करतां येण्यासारखी आहेत तीं.

परमेश्वरी सृष्टींत परिस्थित्यनुरूप प्रकृतीभेद आहेत व त्यांतच स्त्री पुरुष भेद हा एक आहे. यासाठीं स्त्रियांची व पुरुषांची बरोबरी नाहीं, या दोघांत अपरिहार्य भेद असल्यामुळें यांची कर्तव्यें पण भिन्न

आहेत व त्या कर्तव्याला जरूर तसेंच शिक्षण यांना दण्यात यावं, दोघांनांही सारखें शिक्षण देऊन एकमेकांची स्पर्धा करावयास लावणें इष्ट नाहीं, या समानतेचें परिणाम आतांच पाश्चात्य समाजावर दिसत आहेत, व या पायीं त्यांचा समाज शेवटीं पांच चारशे वर्षांत लयास जाईल, पश्चिमेकडे इराण, असीरिया, ईजिप्त, ग्रीस, रोम या संस्कृती व समाज पद्धति या पूर्वी नामशेष झाल्याच आहेत व हल्लींची पाश्चात्य समाज रचना पण अशीच चांगल्या पायावर रचलेली नसल्यानें अखेर दगा देईल इतकें भविष्य आजच करणेस हरकत नाहीं.

पाश्चात्य समाजाचा आजचा थाट पाहून कित्येक हिंदी शहाणे त्यांचे अनुकरण करणेस इच्छित आहेत पण त्यांनी पाश्चात्य समाजाचा गेला शंभर वर्षांचा इतिहास लक्षपूर्वक पाहिला व याच रस्त्यानें ही गाडी आणखी पुढें गेली तर काय होईल याचा त्यानें विचार केला तर त्यास ही सुधारणा लवकर नाश पावणारी आहे असें सहज दिसेल. राजव्यवहारांत सुद्धां पाश्चात्यांत अशीच सुधारणा, सुधारणा म्हणतां म्हणतां राजा, सरदार, व्यापारी यांचें हातांत सत्ता जात जात ती हल्लीं मजुरांचे हातांत जाऊं लागली आहे व तरी सुद्धां त्या गोष्टीनें नांदावी तशी शांती समाजांत नांदेल असें वाटत नाहीं! अगदीं अलीकडील तत्वज्ञ बर्ट्रांडरसेल यानें विचार करून एक समाज रचना उत्तम म्हणून सुचविली आहे व ही समाज रचना आपल्या चातुर्वर्ण-समाज-रचनें प्रमाणें आहे. जी गोष्ट राजकीय बाबींची तीच सामाजिक बाबींची. आपली व्यवस्था अनेक वर्षांचे अनुभवांनीं सुधारतां सुधारतां हल्लींच्या अवस्थेंत आली आहे व पाश्चत्य समाज आपल्या मागून त्याच रस्त्यानें येत आहे तोंच आपण तोंड फिरवून त्याचेकडे जाणे बरोबर नाहीं. आपली हल्लींची व्यवस्था आज पांच चार हजार वर्षें अनेक अडचणींशीं झगडून जिवंत राहिली आहे व तिनें या प्रमाणें आपली योग्यता काळाच्या परीक्षेंत ठरवून दाख-

विली आहे. या प्रमाणें अनेक आपत्तींशीं टिकणारी दुसरी समाज रचना सांपडत नाहीं व म्हणून ही आपली उत्तम रचना आपण सोडतां कामा नये.

पुरुष व स्त्री ही एकमेकांस पूरक आहेत. एकाच्या उणीवा दुसऱ्यानें भरून काढावयाच्या असतात व या साठीं त्यांच्या गरजाप्रमाणें त्यांस भिन्न प्रकारचें शिक्षण हवें. पाश्चात्य समाजांत जी अव्यवस्था व नाशाची बीजें आहेत ती या भिन्न शिक्षणाच्या अभावामुळें होत व हिंदी संस्कृती जी इतकी टिकली ती याचमुळें. हिंदुस्थानांत स्त्रिया व पुरुष यांत स्पर्धा कव्हांहीं नव्हती. ज्या प्रमाणें प्रत्येक जात आपआपलें काम मनापासून आनंदानें करीत आहे त्याच प्रमाणें प्रत्येक व्यक्ति पण आनंदानें आपआपलें काम करीत आहे. त्या कामाला योग्य असें शिक्षण, मनःस्थिती वगैरे प्रत्येकाला मिळत असे पण पाश्चात्यांचें सहवासापासून ही घडी बिघडूं पहात आहे व ती नीट बसविणेंसाटीं प्रत्येकानें झटलें पाहिजे म्हणजे त्यांत घराचें, देशाचें, व जगाचें कल्याण आहे!

हिंदुस्थनांतील जातीसंस्थांत जो बिघाड झाला आहे तो व्यवसाय निर्बंध नाहींसे झाल्यामुळे. एकदां बखेडा झाल्यावेळीं बलीराजानें शुक्राचार्यांचे मदतीनें कोणी कसे रहावे व कोणते व्यवसाय करावे हें ठरवुन निट व्यवस्था लावुन दिली व त्यामुळें प्रजेला इतकें सुख झालें कीं उत्तम राज्य म्हणजे बलीचें राज्य अशी ह्मण पडली. फिरून. परशूरामाचे धुमाकुळांत अव्यवस्था झाल्यावर दाशरथीरामरायाने हल्लींची जाती पद्धती लावुन दिली अठरा कारखान्यांना अठरा पगड जाती नेमून दिल्या. प्रत्येक जातीची रहाणी, उत्पन्न, व्यवसाय वगैरे ठरवुन टाकलें व सुव्यवस्था लावली व त्या मुळें रामराज्य ह्मणजे उत्तम राज्य अशी ह्मण पडली. याचें वर्णन महर्षी वाल्मीकी यानी याप्रमाणें केलें आहे.

चातुर्वर्ण्यंच लोकेस्मिन् स्वे स्वे धर्मे नियोक्ष्यति

मुसलमानी राज्यापासून फिरून ही व्यवस्था ढिली झाली व इंग्रजी राज्यांत तर हिचे निर्बंध फारच सैल झाले आहेत. हे निर्बंध हल्लीं इतके ढिले झाले आहेत व ते फिरून बरोबर बसविणें इतकें अशक्य वाटत आहेत कीं महात्मा गांधि यांना सर्वांनीं अगदीं एक पायरीवर येऊन बसावें हें इष्ट वाटत आहे व खालच्या दर्जाच्या लोकांना वरच्या पायरीवर जाणे शक्य नाहीं या साठीं सर्वांनीं खालचे पायरीवर यावे असा त्यांचा उपदेश आहे ! साधी रहाणी व साधा पोषाक वगैरे त्यांचे उपदेशाचे मर्म हेंच कीं सर्वांना शक्य अशा अवस्थेंत तरी एकवाक्यता व्हावी ! उच्चासनावर सर्वांनीं बसणे शक्य नाहीं व उंच सखल आसनांनीं बखेडा माजतो ह्मणून सर्वांनीं जमीनीवर बसावे असा त्यांचा उपदेश आहे. भगवान् रामचंद्रांनीं पुष्पक विमान कुबेराकडे परत केलें याचें कारण तरी हेंच. सर्वांना जर पुष्पक विमानाचा उपभोग शक्य नाहीं तर तो आपणाला मुळींच नको अशी त्यांची विचारसरणी होती. सुखासमाधानानीं एकमेकांनीं रहावें यासाठीं वरच्या लोकांनीं खालची रहाणी स्वीकारावी ह्मणजे वैषम्य कमी होईल अशी ही युक्ती आहे व ही किती सफल होते हें पाहणें आहे. सत्ता हाती येईपर्यंत तरी याशिवाय दुसरा मार्ग नाहीं हें उघड आहे.

व्यवसाय निर्बंध नाहींसे झाल्यानें जी स्थिती समाजाची झाली तीच स्थिती सतीची चाल बंद झाल्यानें घराची झाली आहे. सर्व सामाजिक सुधारणाचें मूळ हें आहे. सती जाणें बंद झाल्याने विधवांची संख्या वाढली त्यांनीं काय करावें असा विचार पडूं लागला व त्यापासून स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, संकरप्रजा वगैरे अनेक दोष उत्पन्न झाले. व यापासून स्त्रीपुरुषांत स्पर्धा उत्पन्न होत आहे तरुण विधवांसाठीं सती व म्हाताऱ्या माणसांसाठीं तपोवनें या दोन संस्थांची हिंदू समाजाचे पुनरुज्जीवनाला अतिशय जरूर आहे. या दोन संस्था अस्तित्वात आल्या ह्मणजे घरांतील बहुतेक घासाघीस संपेल ! ज्या घासाघिसीच्या भयानें पूर्व ऋषींनीं वेद वगैरेंची व्यवस्था केली तीच घासाघीस स्पर्धेचे सर्व उपायांना ब्रगल देऊन शेवटी

पुढें उभी राहिलीं आहे व घासाघीस ह्मणजे नाशाचे मूळ. जेथें घासाघीस सुरू झाली तेथें नाश हा हळूहळू आलाच ? मग ही घासाघीस एका शरीरांत असो, किंवा एका कुटुंबांत असो, अगर एका समाजांत असो अथवा एका देशांत. घासाघीशिपासून त्या त्या संस्थेचा नाश ठरलेला. ही घासाघीस कमी व्हावी म्हणून तेथें प्रेमाचे वंगण पाहिजे पण हल्लीं त्याऐवजी अभिमानाची वाळु घालण्यांत येत आहे व तिच्या घर्षणानें नाश लवकर होईल असें वाटते हा काळच मुळीं कलियुग. यात तत्वज्ञानाचें मुख्य तत्व जीवन संग्राम ( Struggle for existence ) राजकारणांत ( Struggle for suprcmacy ) राक्षसी महत्वा कांक्षा; एका घरांत ( Struggle for pceation ) आचार स्वातंत्र्य, व देशांत [ Struggle for free thougte ] विचार स्वातंत्र्य याप्रमाणें चोहोकडे कली ' कलह ' सुरु आहे व त्यामुळें प्रपंच नीट होत नाहीं मग परमार्थाचें तर नांवच घ्यायला नको प्रपंच या शब्दाचा अर्थच निराळ्या योग्यतेच्या इसमांना त्यांचे त्यांचे योग्यते प्रमाणें वागवून सुव्यवस्था ठेवणे व या रितीनेंच देहप्रपंच; कुटुंब प्रपंच, राष्ट्रप्रपंच; विश्वप्रपंच चालवावयाचे असतात पण जेथें सर्वच समते साठीं भांडणार तेथें प्रपंच कशाचा व कसा करणार व करणार तरी कोण ?



## भाग पहिला

# नित्यकर्म

---

धर्म हा अवश्य पाळण्याचा असल्यामुळें धर्मांत नित्यकर्म याचा अर्थ रोज करावयाची कर्में. पुरुषांप्रमाणेंच बायकांची पण रोज करावयाची कर्में (१) शौच (२) संकल्प (३) यज्ञ (४) भोग (५) विश्रांती; हीं होत व यांत पुरुषांपेक्षां बायकांचे कामांत काय विशेष आहेत हे मी येथें सांगणार आहे.

१ शौच—शौच म्हणजे स्वच्छता. शरीर हें विवक्षित परिस्थितींतच राहणारें असल्यानें या परिस्थितीस अपायकारक वस्तू तें हमेश बाहेर टाकीत असतें. ही घाण शरीरांतून बाहेर पडली म्हणजे ती लांब टाकली पाहिजे. ही शरीरांत अपायकारक म्हणून बाहेर टाकली यावरूनच ती लांब टाकली पाहिजे हें उघड आहे व यासाठींच शौचाचें महत्व

> अत्यंत मलिनः कायो नवछिद्रसमन्वितः।
> स्रवत्येव दिवानक्तं स्नानं तस्य विशोधनम् ॥ १ ॥

सकाळीं उठल्याबरोबर शौचास जाऊन यावें व तोंड चांगलें धुवावें हें शौच घाण व डाग जाईपर्यंत केलें पाहिजे. घाण व डाग सर्व धुवून जातील इतकें या शरीराला रोज एकदां तरी धुतलें पाहिजे व या धुण्याला शौचापासून प्रारंभ होऊन स्नानांत त्याची समाप्ती होतें. पुरुष शरीरापेक्षां स्त्री शरीराला खांच खळगे जास्त आहेत म्हणून हें शरीर सर्व खळग्यातून चांगलें धुवावें लागतें व यासाठीं त्यानां स्नानाला पडदपोशीची जागा बरी. पुरुषांनी लघ्वी केल्यावर ज्या प्रमाणें पाण्यानें गुह्यांग धुवावें तसेंच स्त्रियांनीं पण केलें पाहिजे व म्हणून लघ्वीला स्त्रिया पाणी घेऊन जातात व "लघ्वीला जाणे" या क्रियेला "पाय धुवायला जाणे"

म्हणतात. पुरुषांचे केंस वपन केलेले असले म्हणजे त्यांचे डोक्यावर घाण सांचत नाहीं पण स्त्रियांचे केस सुंदरतेसाठीं राखलेलें असतात त्यामुळें त्या केंसांत घाम वगैरे घाण पुष्कळ साचते व ती जावी म्हणून पुरुषांचे केंस वपना ऐवजी बायका आठ चार दिवसा डोक्यावरून न्हातात. या डोक्यावरून न्हाण्यानें केसातील घाण सर्व जावी म्हणून केसाला शिकेकाई वगैरे लावून चोळतात. याबाबद पुष्कळ वेळां चूक होते ती. ही कीं केसाची बुड व डोक्याची कवटी चोळावयाची राहून फक्त केसच चोळले जातात. यामुळे केसाचे बुडांत घाण सांचून त्यात उवा पडतात. बायकांना रोज डोक्यावरून स्नान करावयाचें नसतें म्हणून शौच व मुखमार्जन झाल्यावर केसाला तेल लावून केस चांगले विंचरून त्याची वेणी घातली पाहिजे. विंचरण्यांत केसाच्या गांठी सुटाव्यांत त्याचा घोंटाळा होऊं नये इतकेंच नव्हें तर केसाची बुडे व डोक्याची कवटीची घाण निघावी हा उद्देश आहे हें लक्षांत ठेवावें. वेणी घालतांना फार वट्ट घालूं नये व बुचडा फार उंच बांधू नये. यामुळे मानेजवळील केसांना रग लागतें व केव्हां केव्हां ते तुटतात सुद्धां वेणी घालतांना भांग नाकासमोर सरळ काढावा व वेणी झाल्यावर वेणी घालणारीला नमस्कार करावा. वेणी घालून झाली म्हणजे सर्व तोंड चांगले स्वच्छ धुवावें. पूर्वीचें काजळ, हळद, कुंकू यांचे सर्व डाग साफ धुवून काढावें व मग नवीन कुंकू लावावें. हळद, कुंकू, काजळ हीं सौंदर्य वाढविणारी मंगलकारक आहेत म्हणून हीं रोज सर्व कुमारिका व सवाष्णी यांनीं लावावी. विटाळशी अगर सुतकी बायकांनीं नुसते कुंकू लावावें पण वेणी, हळद, काजळ वगैरे लावूं नयेत.

ज्या प्रमाणें शरीर त्याच प्रमाणें कपडे नेहमीं स्वच्छ ठेवावेत. त्यांना पण डाग असूं नयेत व घाण येऊं नये. कपडे रोज धुतलेलें

वापरावे. लुगडे किंवा परकरापेक्षां चोळीला व त्यांत पण खांकेत जास्त घाण येणेचा संभव असतो म्हणून चोळी खांखेत चांगली घांसून धुवावी. स्नानाचे वेळीं पण खांका व गुह्य भाग यांना चोळून धुवावें त्या शिवाय तेथील घाण जाणार नाहीं. नाकांत पण बोटें घालून नाकपुड्या स्वच्छ धुवाव्या. डोळ्याची चिपडें नीट काढावी, कानांत व कानाचे मागील भाग नीट धुवावें त्याच प्रमाणें मन पण स्वच्छ व पवित्र ठेवावें. कोणाचा द्वेष, मत्सर वगैरे मनांत असूं नयेत. मन आनंदी तर चेहरा आनंदी व चेहरा आनंदी तर जगाचे लाडके; असा कार्यकारण भाव आहे हें नेहमीं लक्षांत ठेवावे. लोकांनीं आपणावर प्रेम करावें असें वाटत असेल तर आपण नेहमी आनंदी व हंसतमुख असावें.

आपले शरीर व वस्त्रें जशीं स्वच्छ ठेवावयाचीं तशीच घरातील इतर मंडळीची व मुलाबाळांची पण ठेवली पाहिजेत त्यासाठीं वस्त्रें नेहमीं खुंटीवर अगर दांडी किंवा दोरीवर ठेवावीत. त्यांनां जमीनीवर लोळूं देऊं नयेत. रोज अंगावर घालणेचे कपडे दररोज धुवावें. अंथरूण पांघरूण वगैरे कपडे उन्हांत टाकावें. वस्त्राप्रमाणेंच भांडीकुंडी पण स्वच्छ म्हणजे डाग व घाण नाहीं अशी रोज घांसावी. विशेषतः पाणी पिणेची भांडी हीं उष्टी झाल्यानें खराब होतात. एका माणसाची तोंडाची लाळ दुसऱ्या माणसाचें तोंडास लागूं नये. लाळेतून रोगाचे किडे एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जातात. यासाठीं एकाचें उष्टे भांडें अगर ताट दुसऱ्यानें घेऊं नये. ताट भांडे वगैरे उष्टे केलें कीं तें लागलीच घासून निदान धुवून तरी ठेवावें. भांडी चुलीवर ठेवली म्हणजे जळतात; अन्न, कढ वगैरेंचे त्यावर डाग पडतात. ही जळ व हे डाग घासतानां लवकर जावें म्हणून भांडे चुलीवर ठेवणेंपूर्वी त्याला बाहेरून राख अगर माती लावावी. यामुळें भांड्याला करवड लागत नाहीं व मग जळ वगैरे लवकर घासून निघतात. स्वयंपाकाची भांडी करवडूं नयेत म्हणून त्यांतील अन्न

काढून घेतले कीं त्यांत पाणी घालावें व तें पाणी तोंडाचा कांठ वगैरेवर फिरवावें म्हणजे करवडलेली सर्व शितें वगैरे सुटतात. जेवण झाल्यावर ताटांत पण थोडेसे पाणी घालून हात फिरवून ठेवावा म्हणजे ताट पण करवडत नाहीं व घासणेंस सोईचें होतें. तवा उतरला म्हणजे त्यावर चिंच किंवा अमसुलाचें बुटुक फिरवावें म्हणजे तो चांगला स्वच्छ निघता व रहातो. भाजीस चिंच घालतांनां ती उन्ह पाण्यांत भिजत घालावी. मग तिचा बलक काढून भाजींत घालावा व राहिलेला चोथा बाजूस ठेवावा तो तव्यास लावणेंस उपयोगी पडेल. फोडणीच्या पळया, चमचे वगैरे कांहीं न करवडणेंसाठीं अशीच खबरदारी घ्यावी. प्रत्येक ठिकाणीं नाक व डोळे ही स्वच्छता तपासणेची साधनें आहेत. डोळ्यानी डाग दिसतां उपयोगी नाहीं व नाकानीं वास येऊं नये. चांगला वास पुष्कळदां वाईट वास लपविणेसाठीं मुद्दाम वापरण्यांत येतो यासाठीं चांगल्या वासाचें ठिकाणीं पण सावधगिरी ठेवावी. स्वच्छ म्हणजे ज्याला वास किंवा डाग मुळींच नाहीं तें.

स्वच्छता जशी वस्त्र व पात्र यांची ठेवावयाची तशीच ती घर व आंगण यांची पण ठेवली पाहिजे. रोज सकाळीं व संध्याकाळीं घर स्वच्छ झाडावें. झाडतानां कोपऱ्यांत, दरवाजा जवळ वगैरे भिंतीवर पण केरसुणी फिरवावी. आठ पंधरा दिवसांवर पटई पण झाडावी. कोळ्याची जाळीं हीं उपयोगी आहेत व अपायकारक पण आहेत. माशा, डास, घुंघुरटी वगैरे बारीक प्राणी त्यांत अडकतात व मरतात. हा कोळ्याचें जाळ्यापासून फायदा, पण तेच जाळें अन्न किंवा पाण्यांत गेले तर विषारी आहे हा त्यांत तोटा आहे त्यासाठीं हीं जाळीं कांहीं दिवस असूं द्यावी पण आठ पंधरा दिवसानीं काढलीं पाहिजेत. ती मोठमोठी होऊन लोंबकाळू लागणे चांगलें नाहीं. घरांतील आंगण पण स्वच्छ ठेवलें पाहिजे. आंगण रोज झाडावें, त्यांत सडा टाकावा. आंगणांत तुळशीचे वृंदावन निदान कशांत तरी झाड लावलेलें असावें व या झाडाजवळ सडा घालून रांगोळी

घालावी. आंगणांत सडा टाकतानां उंबऱ्यावर पोतेरें फिरवावें. घरांत येतानां पायाला लागलेली घाण पुष्कळदां उंबऱ्यावर घांसणेंत अगर झटकणेंत येते ती या पोतेऱ्यानें स्वच्छ होते. उंबऱ्यावर पोतेरें घातल्यावर त्यावर रांगोळी घालावी. ही शुभसूचक आहे. सुतकांत मात्र उंबऱ्यावर रांगोळी घालूं नये. दरवाजावर तोरण बांधलेलें असावें. हें तोरण निदान आंब्याचें पानांचें असणेंस हरकत नाहीं. पोतेरें रोज देवापाशीं, चुलीपाशीं, व जेवलेले जागीं अवश्य घालावें. जेवलेले जागचें पोतेरें चुलीपाशीं अगर देवापाशीं नेऊं नये. जेवलेलें जागीं उष्टें खरकटें अन्नरज असण्याचा संभव असतो यासाठीं देवापाशीं अगोदर पोतेरें घालावें, मग चुलीपाशीं घालावें व मग जेवल्याजागीं घालावें. पोतेरें अगर सारवणावर चार रांगोळीच्या रेघा अवश्य ओढाव्या. विटाळशी बसल्याजागीं विटाळ लागण्याचा संभव असतो म्हणून त्या ठिकाणीं सारवून घ्यावें. तसेंच शेतखाना, मोरी, वगैरे ठिकाणीं पण विटाळ पडण्याचा संभव असतो म्हणून विटाळशी बाहेर आली म्हणजे शेतखाना अगर मोरीत पाणी टाकावें म्हणजे तेथील विटाळ धुवून जातो.

घरांतील स्वच्छतेंत मोरीची स्वच्छता हें फार महत्वाचें काम आहे. दरवेळीं लघ्वी वगैरे केल्याबरोबर मोरींत हळूच पाणी टाकावें म्हणजे त्या पाण्याबरोबर सर्व लघ्वी धुवून जाते. भांडीं वगैरे घासलीं म्हणजे पण लागलीच मोरी स्वच्छ धुवावी म्हणजे घांसून निघालेली घाण लागलीच लांब जाते. शितें वगैरे अन्न केव्हांही मोरीत टाकूं नये. हें अन्न कोणा तरी प्राण्याला खायला मिळावें व तें मोरीत गेल्यानें तेथें प्राणी उत्पन्न होऊन वावरूं लागतात असे या करणेंत दोन उद्देश आहे. जेवल्यावर उष्टीं काढतानां पण असेंच सर्व अन्नकण गोळा करून टाकून मग शेण लावावें व मग सारवावें. शिजविलेलें अन्न कुजतें व त्यापासून अपायकारक वायू उत्पन्न होतात. यासाठीं अन्न नेहमीं गुराला घालावें. गुरांचे आं-

बोणासाठीं एक भांडे ठेवून त्यांत सर्व अन्नकण टाकावें व तें गुरांना चारावें. सकाळ संध्याकाळ मोरी चांगली घांसून धुवावी. मोरीचे तोंडास जाळी असावी व त्या जाळींत अडकलेला कचरा रोज सकाळ संध्याकाळ काढावा. घरांतील मोरी गांवचे मोरीस जोडलेली असेल तेंव्हां बाहेरचे मोरीतील घाण घरांत येऊं नये म्हणून एक पाण्याचें दडपण असावें त्याची रचना खाली चित्रांत दाखविली आहे. या दडपणाचे वांकणांत नेहमीं पाणी भरलेले रहावें.

घरची मोरी गावची

दडपण

यामुळें बाहेरची घाण घरांत येऊं शकत नाहीं. हे दडपण सकाळ संध्याकाळ पुष्कळ पाणी टाकून धुवून जाईल असे करावें व त्यांत असलेले खडे, कचरा, वगैरे जिन्नस काढून टाकावे. मोरी झाडतानां जरा खरबरीत अशा खराट्यानें अगर नारळाचे शेंडीने ती घासावी म्हणजे तिचे शेवाळ शेंबूड, अन्नकण वगैरे साफ धुवून जातील. मोरीच्या तोंडाला जाळी बसविलेली असावी म्हणजे पाला, कचरा, वगैरे मोरींत जाणार नाहीं. असला कचरा हातानीं भरून बाहेर टाकावा. अंगणा प्रमाणेंच परसूं पण स्वच्छ ठवावें. या परसांत भाज्या झाडें, फुलें वगैरे लावावी. जेथें पाणी सांचत असेल तेथें अळू, केळी, कर्दळी लावाव्या. अळू, केळी, कर्दळी याचेपाशीं डास होत नाहींत व त्यामुळें सांचलेले पाण्यामुळें हिंव ताप लागण्याचा संभव नसतो. मुलांमाणसांनां लघ्वी करणेसाठीं घरांत एके अंगास एक मोरीच असावी. भिंतीजवळ लघ्वीस बसणेची चाल मोठी वाईट आहे. ही शौचाचे विरुद्ध आहे. घरांजवळ मुताचें ओघळ हेच डाग व त्याची घाण अशी दोन्ही यामुळें उत्पन्न होतात. घराच्या भिंती पण वर्षांतून दोनदां सारवून त्यांनां सफेती द्यावी म्हणजे भिंतीचे पण डाग व घाण जातील ही भिंतीची स्वच्छता एकदा दिवाळीचे वेळीं व एकदा शिमग्याचे वेळीं करावी.

या प्रमाणें मन, शरीर, नाक, तोंड, वस्त्र, पात्र, घर, आंगण, परसू वगैरे स्वच्छ ठेवणें याचें नांव शौच. चार मंडळी एकत्र राहूं लागलीं की प्रत्येकानें हें शौचाचें नियम पाळलेच पाहिजेत. नाहींतर अपायकारक वायू उत्पन्न होऊन त्यापासून रोगराई होण्याचा संभव असतो. घराची स्वच्छता किती असावी याचें उदाहरण म्हणजे भगवान विष्णुचें घर होय. भगवान् विष्णु हे उत्तम गृहस्थाचा नमुना आहे. यांचें घर म्हणजे क्षीरसागर. क्षीरसागर म्हणजे दुधाचा समुद्र. दूध ही वस्तु पांढरी स्वच्छ असून तिला वास नसतो इतकेंच नव्हे तर त्या ठिकाणीं यत्किंचित घाण सोसत नाहीं. यत्किंचित घाण झाली तर तें दूध नासेल असें भय असते. इतक्या स्वच्छतेनें राहणारे भगवान् आपल्या घरीं यावे व आपणांस त्यांचे दर्शन व्हावें असें वाटत असतें. तर आपण आपलें घर किती स्वच्छ ठेवलें पाहिजे बरें? लक्ष्मी ही भगवान् विष्णुची पत्नि व ती पण आपणांस पाहिजे असते व ती आपल्या घरीं यावी व रहावी असें वाटत असेल त्यानें आपले घर दार, कपडालत्ता, भांडेकुंडे, शरीर व मन अगदीं स्वच्छ ठेवलें पाहिजे. या पैकीं कोठें जर घाण असेल तर भगवान् यांची पत्नी तेथें येणें शक्य नाहीं. यासाठीं स्वच्छता ठेवणें साठीं आपण फार जपलें पाहिजें नव्हें जितकें जपूं तितकें थोडेच आहे. ज्या ज्या वेळीं आपणांस फुरसत मिळेल तेव्हां तेव्हां मनापासून परसापर्यंत स्वच्छता ठेवणेंसाठीं झटावें.

या प्रमाणें शौचासाठीं प्रयत्न चालले म्हणजे त्यापासून आपले अंग

शौचात्स्वांग जुगुप्सा परैरसंसर्गः।

लपवावें व दुसऱ्याचे अंगास स्पर्श करूं नये अशी बुद्धि होते. स्वच्छता ठेवणें साठीं आपण झटत असतानां आपलें शरीर किती मलीन आहे व तें स्वच्छ ठेवणें किती कठीण आहे याचा अनुभव येतो व त्यामुळें हें घाणेरडे डाग पडलेलें, अस्वच्छ शरीर लोकानां दाखवूं नये असे वाटूं लागतें. या इच्छेपासूनच कपडे नेसणें व कपडे वापरणेंची प्रवृत्ति होतें. सर्व शरी-

रांत अत्यंत घाणेरडा भाग म्हणजे गुह्यांग व तो कितीही स्वच्छ केला तरी स्वच्छ रहात नाही हे पाहून तो झाकणेची प्रवृत्ति होते. आपण इतके जपतो तरी आपले शरीराची जर ही स्थिती तर जे इतके जपत नाहीत त्यांचे शरीर किती घाणेरे असेल असा दुसरा विचार शौचाचें अभ्यासा-पासून मनांत येतो व म्हणून दुसऱ्याला शिवूं नये असें वाटतें. प्रत्यक्ष आपल्याच शरीराचा एक भाग जो डावा हात तो शौचाचे काम करतो म्हणून पूजा, जेवण, वगैरे पवित्र कार्यांत वापरणेस आपणांस संकोच वाटतो मग दुसऱ्याचें शरीर व तें सुद्धा घाणेऱ्या कामांत वापरलें जातें हें पाहिल्यावर त्या दुसऱ्याला स्पर्श करूं नये असें साहजकिच वाटणार. कोळशाचें खाणींत काम करणारें माणसाला स्वच्छ कपडे वापरणारा इसम लांबच ठेवणार मग तो समानतेच्या किती कां गप्पा मारीना हा कोळशे विक्या स्वच्छ कपडे घालून आला तरी " बाहेरसे तो खूब बनी है पर अंदरकी बात राम जाने " असेच तो म्हणणार. खाटीक हे हमेश गुरे मारण्याचें व चिरण्याचें काम करतात त्यामुळे त्यांच्या हृदयांत दया कमी असतें हें पाहूनच अमेरिकन सरकारनें खाटकानां ज्युरींत घेऊं नये असें ठरविलें आहे. तात्पर्य पवित्रता व स्वच्छता याचे नादी जो मनुष्य लागला तो स्पर्शास्पर्श दोष पाळूं लागणारच असे झालें म्हणजे कालांतरानें या स्पर्शास्पर्शाचा अतिरेक व्हायचाच. या अतिरेकासंबंधानें मात्र ठेववेल तितकी सावधगिरी ठेवावी बाकी स्पर्शास्पर्श अजिबात नाहीसा करणें गैर आहे व तो एकदा ढिला होऊं लागला म्हणजे हे ढिलेपण कोठपर्यंत जाईल याचा पण नियम रहात नाही.

संमार्जनोपलेपाभ्यां गृहमंडलवर्तनैः ॥
स्वयंचमंडितानित्यं परिकृष्टपरिच्छदा ॥ १ ॥

संकल्प— समाज झाल्याबरोबर ज्या प्रमाणें शौच अवश्य व त्याबद्दल नियम करणेंत येतात त्याच प्रमाणें समाज म्हटला की त्यांत संकल्प म्हणजे कामाची वाटणी अवश्य होय. अशी कामें वाटून घेणे म्हणजेच प्रपंच. प्रपंच म्हणजे निरनिराळ्या इसमांनी आपले

योग्यते प्रमाणें कामे वाटून घेणे होय. हें प्रपंच चार आहेत. (१) विश्वप्रपंच, (२) राष्ट्रप्रपंच (३) कुटुंबप्रपंच (४) देहप्रपंच निरनिराळ्या राष्ट्रांनीं आपआपल्या परिस्थित्यनुरूप जगांतील कामे वाटून घेऊन सलोख्यानें सर्व विश्व चालविणें याचे नांव विश्व-प्रपंच. प्रेसिडेंट विल्सन यांचा राष्ट्रसंघ हा या विश्वप्रपंच्याचा कर्ता होय. पृथ्वीवरील सर्व राष्ट्रे या प्रपंचाचे घटक होत. या खालीं आपण एका राष्ट्रांत आलो म्हणजे राष्ट्रांतील निरनिराळे समाज, जाती, गण, धंदेवाले यांनीं कामे वाटून घेऊन सलोख्यानें सबंद राष्ट्राची उन्नती करणेंसाठीं झटणें. याचे नांव राष्ट्र प्रपंच राजसत्ता ही या राष्ट्र प्रपंचाचा कर्ता असते व तिच्या कर्तबगारी प्रमाणे हा प्रपंच चांगला अगर वाईट होत असतो. त्याच्या खालीं आले म्हणजे कुटुंब प्रपंच होय. एका कुटुंबांत आई, बाप, भाऊ, बहीण, मुले, लेकरे नोकर, चाकर, या सर्वांनीं कामे वाटून घेऊन ती सर्व कुटुंबाचें हिताचे दृष्टीनें एकोप्यानें करणें याचें नांव कुटुंब प्रपंच. घरांतील कर्ता पुरुष हा या कुटुंबातील कर्ता असतो व त्याचे योग्यते प्रमाणें त्याचा कुटुंबात दरारा असतो व त्या प्रमाणें हा प्रपंच चांगला अगर वाईट होत असतो व शेवटी देह प्रपंच. सर्वसंग-परित्याग केलेल्या संन्याशाला सुद्धां हा प्रपंच सुटत नाहीं. या देहांत पांच कर्मेंद्रिये पांच ज्ञानेंद्रिये, मन वगैरे मंडळीनी कामे वाटून घेऊन देहाचे हिताकडे दृष्टी देऊन सलोख्यानें कामें करणें म्हणजे देह प्रपंच. जीवात्मा हा या प्रपंचाचा कर्ता होय. व त्याची हुकमत जितकी चालेल त्या प्रमाणें तो चांगला अगर वाईट होतो.

वरील प्रपंचाचे विवेचनावरून हे लक्षांत आलेच असेल कीं सर्वत्र समता हा या प्रपंचाचा पाया नाहीं. विषमता हाच प्रपंचाचा पाया होय. किंबहुना विषमता आहे :म्हणूनच प्रपंच. विषमता

नाहीशी झाली तर प्रपंचच संपला. ही विषमता प्रपंच चालावा म्हणून राजिखुषीनें पत्करून त्या प्रमाणें मनापासून वागणे म्हणजे प्रपंच उत्तम करणे होय. या साठीं प्रपंचाचा अभिमान धरणाऱ्या व्यक्तिनी समतेवर भर देतां कामा नये. आपआपल्या कामांत जो तो श्रेष्ठ पण मीच हें काम कां करीन दुसऱ्यांनीं कां करूं नये असें म्हणणे गैर. जो अन्नकण डोळ्याचें ठिकाणीं जाऊन तेथें शरीरांत जन्म पावला त्यानें डोळ्याचें काम केलें पाहिजे. व तो तसे न करील तो वडस होऊन डोळ्याला वैगुण्य किंवा कमीपणा आणील. डोळयाचा उत्कर्ष करणेचा हा मार्ग नव्हे. त्याच प्रमाणें एका जातींत जन्मल्यावर त्याच जातीचें काम उत्तम करणेच थोरपण. मी दुसऱ्या आमक्या जातीचे काम चांगले करीन. म्हणून रुसून बसण्यानें त्या जातीचा उत्कर्ष होत नाहीं पण उलट तिला कमीपणा येतो. असला चांगला इसम तिला उपयोगी पडत नाहीं म्हणून तिला कमीपणा मात्र येतो. जी गोष्ट जातीची तीच गोष्ट व्यक्तिची या साठीं कुटुंबाचे कल्याण व्हावे असें वाटत असेल तेव्हां बायकांनी पुरुषांची, मुलांनीं, आईबापांची, नोकरांनी धन्याची स्पर्धा करूं नये. यजमान किंवा कर्ता वाईट मिळाल्यानें थोडे नुकसान होईल पण स्पर्धेने त्यापेक्षां जास्त नुकसान होईल. यासाठींच प्रल्हादानें आपल्या बापानें दिलेल्या सर्व शिक्षा आनंदानें भोगल्या. व कुटुंब नाश होऊं दिला नाहीं, पण बिभीषणानें रामाला मिळून सगळ्या लंकेचे वाटोळे केलें. या पौराणिक कथापासून आपल्याला फार बोध घेणेसारखा आहे. याच प्रमाणें एका कुटूंबातील बायकांनीं कामे वाटून घेऊन जी भागाला येतील तीं कामे मुकाट्यानें व आनंदानें करावीत.

पहिल्यानें प्रत्येक कुटुंबांत कोणी तरी एक, सर्वांत श्रेष्ठ अशी ठरविणेत यावी व तिचे आज्ञेंत इतर सर्वांनी वागावे. मोठ्या बायकांनी जास्त श्रमाची कामे पत्करावी व लहानानीं कमी श्रमाची घ्यावी. शक्ति पाहून त्याप्रमाणें लहान मोठी कामें वाटावीं. उदाहरणार्थ पाय धुवावयाला पाणी देणें, स्नानास पाणी देणे, धोतर चुणून देणे, पुजेचे साहित्य करणे, संध्येस मांडणे, पाने घेणे, तूप, मीठ वगैरे पदार्थ वाढणे ही कामे लहान मुली, सुना यांनी करावी. पाणी भरणे, स्वयंपाक करणें, वाढणे, भांडी घासणे दळणे, कांडणे ही कामे मोठ्या बायानी करावी सगळयांत पोक्तबाई अगर शहाणी असेल तिणे स्वयंपाक करणे व धान्य निसणे ही कामे घ्यावी. ही कामे फार महत्वाची व नाजूक आहेत. जिला अक्कल कमी, व शक्ति जास्त तिणे भांडी घांसणे, दळणे, कांडणे ही कामे करावी व जिला अक्कल कमी व शक्ति पण कमी तिणे झाडणे, लोटणे, कपडे धुणे ही कामे करावी. मुलांचे संगोपन वगैरेची हीच स्थिती. जास्त शहाणी असेल तिणे मुलाला खायला घालणे, औषध घालणे ही कामे करावी. जास्त शक्तिमान तिणे कपडे धुवावे व मुलाला खेळवावे व कमी शक्तिवान तिणे मुलाला निजवावे. घरांत दोघे नवरा बायकोच असतील तेव्हां त्यांनी पण याच प्रमाणें आपसांत कामाची वाटणी करावी. शक्ति अक्कल, वेळ, ऐपत ही पाहून या प्रमाणें कामांची वाटणी केली म्हणजे त्या त्या व्यक्तिला ती ती कामें करणें सोईचे होते, कामांचा गोंधळ होत नाहीं. जी ती व्यक्ति आपले सवडी प्रमाणें आपले सोई प्रमाणें ती कामें वेळचेवेळी करणेबद्दल झटत रहाते. व एकंदर कुटुंबाची व्यवस्था नीट रहाते. एका कुटुंबांत जोडणारी व तोडणारी अशा दोन शक्ति असतात. मोठी माणसे ही जोडणारी शक्ति व लहान मुले ही तोडणारी शक्ति व जी गोष्ट

परमेश्वराला घडविणे असेल त्या प्रमाणें यापैकीं एक अगर दुसरी शक्ति तो जास्त ठेवतो. धनिकांना सहसा मुलें नसतात याचे कारण हेंच धनिकांचें घरांत परमेश्वराला जोडणारी शक्ति जास्त इष्ट असते व तोडणारी नसते म्हणून तेथें मोठी माणसे जास्त व मुले कमी असतात. गरीबाचें घरांत मोडावयाचेंच जास्त असते म्हणून तेथें मुलें रगड असतात. यावरून पाहिलें म्हणजे प्रत्येक घरांत परमेश्वर काय व कसें घडवून आणतो हें दिसते. परमेशाश्वचें मनांत धनिकांचे घर मोडावयाचे आले ह्मणजे तेथें मुलें नसतात ह्मणून परमेश्वर रोगांची योजना करतो व मग आजारीपणामुळें जिनसा अव्यस्थेमूळें नाश पावूं लागतात. तसेंच गरीबाचें घरांत जोडणी करणे असेल तेव्हां मृत्यु संख्या वाढवून तोडणारी शक्ति कमी करणेंत येते. यासाठीं मुलाबाळांनीं कांहीं वस्तु मोडली, तोडली, हरवली तर फार रागावूं नये. त्यानां नीट शिकाविणें-पुरते रागवावे. रागावणे ह्मणजे एक शापक्रिया आहे व हिच्या मुळें कुटुंबाचे स्थैर्य आरोग्यावर घातुक परिणाम होतो ही गोष्ट नेहमीं नजरेसमोर ठेवावी. विशेषतः अन्न, पाणी औषध वगैरे देतानां मुळींच रागावूं नंय. रागावल्यानें आपण देत असलेले अन्न विषा-प्रमाणें मारक होते. आपण स्वतः सुद्धां अन्न, पाणी किंवा औ-षध घेतानां रागावूं नये. जेवतानां रडू नये ह्मणून शास्त्रकार सांगतात ते याच साठीं. रडूं आवरत नसेल तर उठुन एका बाजूस जावे, मनमुराद रडावे, मग हात पाय व तोंड धुवून भोजनास बसावें. अन्नखाणे ही क्रिया अतीशय जबाबदारीची आहे. कारण त्या अन्नापासून सर्व शरीर व त्यापासून बुद्धि व कर्मे हो-णार यासाठीं हें अन्न फार जपून काळजीपूर्वक केले पाहिजे. माल, मसाला काळजीपूर्वक निवडून घ्यावा, तो काळजीपूर्वक शिजवावा, तो प्रेमानें वाढावा व आनंदानें खावा ह्मणजे त्या

पासून उत्कृष्ट शरीर बनते व त्यापासून उत्कृष्ट कर्म निर्माण होऊन कल्याण होते व या सर्व क्रिया बायकांचें हातून व्हावयाच्या ह्मणून त्यांच्यावर जबाबदारी फार मोठी आहे.

आपल्यात ‘ अन्नमयप्राण व प्राणमय पराक्रम ’ अशी म्हण आहे. हालचाल करण्याची शक्ति याचे नांव प्राण व ही अन्नमय म्हणजे अन्नाची बनलेली आहे. जशा प्रकारचें अन्न खावें तशा प्रकारची हालचाल करण्याची शक्ति माणसांत येते. प्राणमय पराक्रम ह्मणजे जशी त्याची हालचाल करण्याची शक्ति असेल तसा त्याचा दुसऱ्यावर पगडा बसतो. पराक्रम ह्मणजे दुसऱ्यावर पगडा. एकंदरींत माणसाचा दुसऱ्यावर पगडा बसण्यासाठीं चांगले अन्न त्याला मिळाले पाहिजे. चांगले अन्न ह्मणजे पुष्कळ मौल्यवान् भारी किंमतीचे किंवा घृतकुल्या मधुकुल्या म्हणजे तूप साखरेंत घोळलेले ते नव्हें. साधे स्वस्त पण स्वादिष्ट रुचकर पचायला हलके अंगाला लागणारे ते चांगले अन्न. चांगला चाकू किंवा चांगला घोडा म्हणजे जो चाकू आपले काम उत्तम करतो, जो घोडा आपले काम उत्तम करतो तो. चाकूनें जिन्नस कापावयाची असते, घोड्यावर बसून जावयाचे असते तेव्हां जो चाकू जिन्नस झटकन व नीट कापतो तो चांगला चाकू किंवा जो घोडा पुष्कळ लांब व जलद जातो तो चांगला घोडा. तसेंच अन्नानें मनुष्याचें शरीर तृप्त व पुष्ट व्हावयाचे असते म्हणून जे अन्न शरीराला तृप्त करील व पुष्ट करील ते चांगले अन्न गीतेंत भगवंतानी पण चांगल्या अन्नाचे हेच गुण सांगितले आहेत.

आयुः सत्व बलारोग्य सुखप्रीति विवर्धनाः
रस्याः स्निग्धाः स्थिराः हृद्याः आहाराः सात्विकप्रियाः ॥ १ ॥

ज्या अन्नाचे योगानें आयुष्य वाढते, कंटकपणा येतो, शक्ति वाढते, रोग होत नाहीं सुख वाढते, प्रेम वाढते असे रुचकर, ओषट, घट्ट व आवडणारे जे अन्न तें चांगले अन्न तात्पर्य धान्य चांगले ह्मणजे अक्षत किडीनें न खाल्लेले घ्यावे, त्यातील खडे, माती वगैरे काढावे, मग ते नीट शिजवावें व त्याचा मऊपणा जाण्यापूर्वी नीट चावून सावकाश खावे ह्मणजे तें

चांगले जेवण. मग हे जेवण कोरडी भाकरी, किंवा नुसती आंबील अथवा साधी भाजी किंवा ताजी गोड फळे असली तरी चालेल पक्वान्न ह्मणजे तूप साखर घातलेले अन्न हे चांगले वाटेल पण हें चागले नव्हे. तूप व साखर या दोन्ही जिनसा मेंदूला उत्तेजन देणाऱ्या आहेत म्हणून मेंदू त्या जिनसा पाहिजे म्हणतात पण नुसते मेंदू म्हणजे शरीर नव्हे व यासाठीं आपण या शरीरातील आधिकाऱ्यांचे नादीं लागूं नये. पदार्थ रुचकर असावा पण त्यांत साखर फार असूं नये. तो ओषट असावा पण त्यांत तूप फार असूं नये. या जिनसा माफक असाव्या म्हणजे ते चांगले अन्न. ही अन्नाची गोष्ट आयानी फार लक्षांत ठेवावी व या गोष्टिकडे दुर्लक्ष केल्या नेच हल्लींची क्षीणावस्था मुलांना आलेली असते. दूध हे परमेश्वराने पूर्ण अन्न निर्माण केले आहे. हे जितके गोड तितकेच गोड अन्न पाहिजे. दुधांत साखर घालणे बरोबर नाहीं. साखर घालणे म्हणजे जिभेचे चोचले पुरविणे व मेंदुच्या तंत्रानें वागणे होय. अशक्त पोराला पारठ्या गाई म्हशीचे दूध पचत नाहीं म्हणून त्यांत पाणी घालावयाचे असते व या पाण्याला रुची येण्यापुरती साखर घालायला वैद्यशास्त्र सांगते. पण दुधांत पाणी न घालतां ते उलट चांगले आटवून त्यांत आणखी साखर घालून बासुंदी करणे म्हणजे मेंदूचें लाड पुरविणे नव्हे तर काय ? खऱ्या अन्नाला ही साखर नको. नुसते दूध जितपत गोड असते तितपतच गोड अन्न असायला पाहिजे म्हणजे ते उत्तम अन्न. यासाठीं आयाबहिणीनो मेंदूचें चोचलें पुरवून शरीरांत आधिकाऱ्यांचे प्रस्थ माजवू नका. जीवात्म्याचे ताब्यांत सर्व शरीर चालले पाहिजे. अधिकारी शिरजोर होऊन त्याला बाजूला सारून त्यानचि सर्व सत्ता बळकावून बसणें एकंदर शरीराचें दृष्टीनें घातक आहे. सर्व शरीरांत मेंदूचाच खर्च जास्त असतो व त्यांत त्यांचे प्रस्थ माजवून शरीराचे दिवाळे काढणें चांगले नाहीं. आपण हल्लीं पाहिजे त्यापेक्षां जास्त अन्न खातो व असे करून सुद्धां पाहिल्या लोकां प्रमाणें पुष्ट नाहीं याचे कारण हेच. नेहमी विचार, चिंता मनोराज्ये यांत

अन्नाचा कितीतरी खर्च होत असतो व त्यामुळें तितके अन्न शरीराच्या इतर भागाला मिळत नाहीं ' राजा कालस्यकारणं ' ही म्हण सर्वथैव खरी आहे. हिंदुस्थान सरकारची जी स्थिती तीच आपल्या घराची व तीच आपल्या शरीराची. इंग्रज अधिकाऱ्यांनां देण्यांत इतके पैसे खर्च होतात कीं देशांत उपयुक्त कामें करतां येत नाहींत. चैनीत इतके पैसे खर्च होतात कीं घरांत पोटभर अन्न अंगभर वस्त्र मिळत नाहीं. मेंदूचे चोचले पुरविणेत इतके अन्न खर्च होते कीं हाता पायाला ताकद नाहीं व या सर्वांवर एकच असहकारितेचा उपाय आहे.

राजकारणांत इंग्रज अधिकाऱ्यांचे तंत्रानें वागू नये व ते होतील तितके कमी करणेचा प्रयत्न करावा तसेंच घरांत जितक्या कमी करता येतील तितक्या चैनीच्या जिनसा कमी कराव्या. व शरीरांत पण जितके साधे रहातां येईल तितके राहून पुष्कळ कष्ट करावें. असें हे असहकारितेचे तप आहे. या तीन गोष्टी तीन माणसांनीं करावयाच्या आहेत. राजकारणांत प्रमुख भाग पुरुषांनीं घ्यावा; घरांत प्रमुख भाग बायकांनीं घ्यावा व शरीरांत प्रमुख भाग पोरांनी घ्यावा. या प्रमाणें कामांची वाटणी करून आपण कामाला मनापासून लागलो तर आपणाला हटकून यश येईल. या कामांत एकमेकांनी एकमेकांस मदत केली पाहिजे. माझे एक स्नेही वर्षाचे काठी दोन तीन हजार रुपयाचें उत्पन्न असलेले आहेत. त्यांचे घरीं दोन दिवस मला राहण्याचा प्रसंग आला तेव्हां मी पाहिले कीं त्यांची मुलें नमस्कार वगैरे घालीत नाहींत व फार अशक्त आहेत. तेव्हां मी मालकानां प्रश्न केला कीं तुमची मुलें मेहनत कां करीत नाहींत तेव्हां तें म्हणालें त्यांना मेहनत सोसत नाहीं. मी म्हटलें ती दूध पितात कां तेव्हां तें ह्मणालें अहो आठ आणे शेर दूध आहे. इतके महागाईचें दूध मुलांनां कसें पाजणार. त्यावेळीं मी म्हटलें कीं या मुलांचें मखमालीचे कपडे व जरीच्या टोप्या विकल्या तर यांनां एक वर्षभर दूध पिंता येईल व शरीर मजबूत असणे हें चांगल्या कपड्यापेक्षां इष्ट नव्हे कां.

तात्पर्य आपण हल्लीं दागदागिनें, कपडेलत्ते, नाटकें मोटारी यांत इतके पैसे खर्च करतो कीं दूध पिण्यास आपणांस मिळत नाहीं मागे मी ज्यांनां पोटभर खाऊन ऐपत असेल त्यांनीं खुशाल दागदागिनें वगैरे करावे असें म्हणत असे पण गेल्या दहा पांच वर्षांचे अनुभवानें माझे ते बदललें आहे ज्यांनां ऐपत असेल त्यांनीं सुद्धां या चैनी करूं नयेत असें मी आतां ह्मणतों व याचे कारण असे की जग हे देखावेखी चालते व ऐपत आहे तो चैन करूं लागला म्हणजे त्याचे पाहून ऐपत नाहीं तो पण चैन करूं लागतो सबब सर्वांनीच चैन सोडावी असें माझे मत आहे व महात्मा गांधींचे पण हेच मत आहे. याप्रमाणें आपण चैन सोडली तर सर्वांनां सुखानें आनंदांत रहतां येईल. ही चैन बंद करण्याचें पुष्कळ काम बायकांनां करतां येणे सारखे आहे व म्हणून या ठिकाणीं या गोष्टीचा इतका विस्तार केला. पहिले बाजीराव किंवा शिवाजी महाराज हे प्रधान व राजे होते तरी भाकरी व हुरडा खाऊन निर्वाह करीत व यामुळें त्यांचे वर्तन पाहून इतर लोक पण तसे वागत. साध्या रहाणीनें लोकांत स्पर्धा नव्हती व त्यामुळें सर्व लोक सुखी होते. चैनीने मोंगलांचे राज्य बुडाले ही गोष्ट त्या वेळचे लोकांचे डोळ्या समोर होती पण पुढें सवाईमाधवरावांचे वेळीं पेशव्यांचे घरांत चैन शिरली ती या दुष्काळाचे दिवसांत सुद्धां आपल्या घरांतून बाहेर पडत नाहीं याला काय करावे आतां लंबक फिरून परत फिरत आहे पहावे काय होते ते तात्पर्य भगीनीनों तुम्हाला येथें इतकेंच सांगावयाचें कीं अगदीं साधे अन्न पण काळजी पूर्वक तयार करून आनंदानें मुलाबाळानां घाला म्हणजे ती चांगली पुष्ट होतील.

अन्नासंबंधानें दुसरी गोष्ट सांगावयाची ह्मणजे ते सहज पचणारे व चांगले शिजलेले असावे तसेंच तें वेळेवर मिळावे. पचण्याला कठीण असें अन्न खाऊं नये तसेंच

न कृष्टपच्यमश्नीयादकृष्टं चाप्यकालतः ।

पचण्यास सोपे अन्न पण भलत्या वेळीं खाऊं नये. गरीबीमुळें ज्यांना वेळेवर अन्न मिळणे शक्य नसेल त्यांची गोष्ट निराळी पण सर्वांनी नियमित वेळीं नियमित आहार करणेचा प्रघात ठेवावा. अगोदर चांगली भूक लागल्या शिवाय खाऊं नये व नेमल्या वेळीं रोज खाण्याची संवय ठेवली ह्मणजे त्यावेळीं नेमकी भूक लागते. अनियमितपणा नसाव तसाच अतिनियमितपणा पण चांगला नाहीं. " कालस्य कुटिलागतिः ' काळ हा वांकडा वांकडा चालणारा आहे व त्याशी टक्कर मारतां येईल इतका थोडासा अनियमितपणा पण पाहिजे व यासाठी दर आठ दिवसांत एखादा उपवास करावा. जेवणांत जास्त खाण्यापेक्षां थोडे कमी खावे ह्मणजे बरे. काळ वांकडा असला तर तो कांही अन्नांत आपणांस बुडविणार नाही तर तो वांकडा झाला तर आपणांस अन्न देणार नाही व यासाठी आपण तयार असले पाहिजे. काळाशी टक्कर देणेसाठी जी तयारी करावयाची ती अशी पाहिजे. व्रते वगैरे करून कष्ट सोसावयाचे ते याच साठीं. सुख येऊन अडचण झाली असें कधीं होत नाहीं. सुखाचा उपभोग आपल्या ताब्यांत असतो तसा दुःखाचा नसतो. व म्हणून दुःख सोसण्याची नेहमीं तयारी ठेवावी लागते. तपाचरण पण या साठींच आहे दिवसभर काम करण्याची संवय असणें चांगलें. तपाचरणा पासून फायदा तो हाच कीं सुख आले तरी ठीक व दुःख आले तरी हरकत नाहीं. पत्ते खेळणाऱ्या मुलाला अभ्यास करणें, गाडीत जाणाराला पायी जाणे, सुग्रास अन्न खाणाराला पक्वान न मिळणें जसें कष्टप्रद आहे तसेच अभ्यास करणाऱ्या मुलाला खेळणे पायी चालणाराला गाडीतून जाणें साधे अन्न खाणाराला पक्वान्न मिळणे नाहीं यासाठीं कालाशी टक्कर देणे करतां अनियामितपणाची संवय ठेवणें ती दुःखाचे बाजुला असावी. आपणांस पोटभर अन्न मिळत असले तर एक दिवस पोटभर न खाण्याचा नियम ठेवावा. आपणांस रोज गोड अन्न मिळत असले तर एक दिवस गोड न खाण्याचा नियम ठेवावा. रोज नोकर मिळत असले तर एक

दिवस नोकराकडून काम न करविण्याचा अगर नोकराशिवाय आपण स्वतः करण्याचा नियम ठेवावा, रोज वाहन मिळत असले तर एक दिवस पायी जाण्याचा नियम करावा, रोज बाजारांतील तयार जिन्नस आणीत असलो तर एक दिवस घरीं ती जिन्नस तयार करून वापरण्याचा नियम ठेवावा. आपल्या शास्त्रकारांनीं सांगितलेल्या नानाव्रतांचा, नानानियमांचा हेतू यावरून स्पष्ट होईल. अमुक दिवशीं अमुक करूं नये, तमुक वारीं तमुक करूं नये, अमक्या तिथीला असें वागावें या नियमांचा उद्देश तपाचरणानें काळाशीं टक्कर देणेचा असतो व यासाठीं हें नियम नीट पाळावे.

**यज्ञ**—मनुष्य प्राणी हा विचार करणारा प्राणी आहे. इतर सर्व जगांत माणसांचा विशेष म्हणजे हाच. मनुष्य प्राणी विचार करूं लागला म्हणजे त्याला जगांत जिकडे तिकडे सर्व वस्तू आपल्यावर एक सारखे उपकार करीत आहेत असें त्याला दिसते. तेजावांचून माणसांचें चालावयाचें नाहीं व सूर्य व अग्नी हें त्याला ते तेज स्वतः झिज सोसून देत असतात. स्वतःला जाळून घेऊन लांकडें, तेल वगैरे जिन्नस माणसाला प्रकाश, उष्णता वगैरे देतात. वायू वांचून माणसांचे घटकाभर चालणार नाहीं व हा वायु स्वतः स्वच्छ राहून माणसाला सुख देत असतो. माणसानें घाण केली तर ती वाळवून तो त्याला त्रास होऊं नये असे करतो. पाणी तर माणसांचें जीवनच आहे त्याबद्दल विशेष स्पष्टीकरण करणेची जरूर नाहीं व पृथ्वी नसेल तर माणसाला पाऊल सुद्धा टाकतां येणार नाहीं. संसारांतील सर्व वस्तूंना मूळ पृथ्वी आहे खाणी, झाडें, घर, वगैरे सगळ्या वस्तू पृथ्वीवांचून अशक्य व म्हणून अर्थशास्त्रांत जमीनीला अत्यंत महत्व आहे. सर्व भोग्य वस्तु जमीन, भांडवल व श्रम या तीन गोष्टीपासून होतात पण त्यांत जमीन नसली तर दुसऱ्या दोन व्यर्थ आहेत व नुसती जमीन दुसऱ्या दोन वांचुन कांहीं तरी उत्पन्न करूं शकेल. झाडें व वनस्पती माणसांना अन्न पुरवितात इतकेंच नव्हे तर

माणसांनी श्वासोच्छवासानी वाईट केलेली हवा झाडें फिरून शुद्ध करून माणसांनां देतात. पशु पक्षी हें माणसांनां दूध व वस्त्रे पुरवितात, घाण नाहिशी करतात व माणसे यांचा अन्नाकडे पण उपयोग करतात. उबदार कपडे पशुपक्षांशिवाय शक्य नाहींत. या प्रमाणें अन्नासाठीं वनस्पती व वस्त्रासाठीं प्राणी माणसांना अवश्य आहेत. माणसे तर समाजाची व्यवस्था लावून आपले अनुभव मांडून ठेवून माणसांच्या किती तरी उपयोगी पडतात. याप्रमाणें जगांतील सर्व वस्तु आपल्यावर किती उपकार करीत आहेत हे पाहिल्यावर जो कृतज्ञतेच्या ओझ्याखालीं वाकणार नाहीं तो माणूसच नव्हे.

जगांतील वस्तु याप्रमाणें क्षणोक्षणीं आपल्यावर उपकार करीत आहेत हें पाहिल्यावर त्यांचे अंशतः तरी यथाशक्ति उतराई होण्यासाठीं माणसानें झटणें अगदीं साहजीक आहे व या उपकाराचें उतराई होण्याचे प्रयत्नाला स्वार्थत्याग किंवा यज्ञ असें म्हणतात. असा यज्ञ पांच प्रकारांनीं करतां येतो. (१) द्रव्ययज्ञ, (२) तपोयज्ञ, (३) योगयज्ञ, (४) स्वाध्याय यज्ञ, व (५) ज्ञानयज्ञ असें हे यज्ञाचें पांच प्रकार आहेत. आपली वस्तु दुसऱ्याला देणें याचे नांव द्रव्ययज्ञ. कर, वर्गणी, दान, भिक्षा वगैरे सर्व द्रव्ययज्ञ आहेत. दुसऱ्यासाठीं आपण कष्ट करणे याचे नांव तपोयज्ञ. सेवा करणेंचे सर्व प्रकार यांत येतात. आपल्याला येत असलेली कला अगर कसब दुसऱ्यांस शिकविणे याचे नांव योगयज्ञ. आपल्याला येत असलेली विद्या दुसऱ्यास शिकविणें याचें नांव स्वाधाययज्ञ. कोणतेही काम करतां येऊन त्याचे सांगोपांग स्पष्टीकरण करतां येणे याचें नांव विद्या. नुसते काम करतां येणे याचे नांव कला. कला मुक्यालाहि शिकविता येईल पण विद्या त्याला शिकवितां येणार नाहीं. नुसते तोंडानें सांगता येणे याला सुद्धां कित्येक विद्या म्हणतात. आपण परमात्म्याचा साक्षात्कार करून घेतल्यावर तसा साक्षात्कार दुसऱ्यास करून देणे म्हणजे ज्ञानयज्ञ. ज्ञानयज्ञ फक्त सत्गुरुच करूं शकतात आपल्यावर जगांत उपकार करणारे

पांच इसम आहेत. देव, ऋषि, पितर, मनुष्ये व भूते हे ते पांच इसम होत. या पांचाचे उपकारांच उतराई होणेसाठीं पांच यज्ञ शास्त्रकारांनी रोज करावे ह्मणून सांगितले आहेत देवांची पूजा वगैरे करून त्यांचें उपकार स्मरणे हा देवयज्ञ. नवीन ज्ञान संपादन करणें व दुसऱ्यास शिकविणे हा ऋषियज्ञ किंवा ब्रह्मयज्ञ. वाडवाडिलांचे स्मरण ठेवून त्यांनीं घातलेले कुलाचार पाळणे, त्यांचे श्राद्ध करणें हा पितृयज्ञ. माणसांनां भिक्षा. माधुकरी वगैरे घालणे याचे नांव मनुष्ययज्ञ व गाईला गोग्रास, कुत्रे, कावळे यांनां काकबळी, तुळस, उंबर, यांनां पाणी वगैरे घालणे याचे नांव भूत यज्ञ. असें हें पांच यज्ञ प्रत्येक माणसानें अर्थात् गृहस्थानें केलेच पाहिजे. व त्यांस या कामीं मदत करणे हें त्यांच्या कुटुंबातील माणसांचे पवित्र कर्तव्य होय.

यज्ञ ह्मणजे काय हें याप्रमाणें पाहिल्यावर वरील पांच व पांच मिळून दहा प्रकारापैकीं आपल्याला होईल त्या प्रकारचा यज्ञ प्रत्येक स्त्रीनें रोज करावा कांहीं तरी परोपकाराचें कृत्य केल्याशिवाय झोपी जावयाचें नाहीं असा प्रत्येक स्त्रीनें निश्चय केला पाहिजे. गरीबी, अत्यंत गरीबी असली तर द्रव्ययज्ञ करतां येणार नाहीं पण बाकीचे चार यज्ञांचे प्रकारापैकीं कोणचा तरी प्रकार शक्य असेलच. कोणाला सुईणपणा करतां येईल, कोणाला रोग्याला औषध देतां येईल, कोणाला आंधळ्याला रस्ता दाखवितां येईल, कोणाला गाणें म्हणायला शिकवितां येईल, कोणाला लिहायला वाचायला शिकवितां येईल याप्रमाणें अनेक प्रकारापैकीं कोणत्या तरी प्रकारानें दुसऱ्याचें उपयोगी प्रत्येक स्त्रीला पडतां येईल. दुसऱ्याचे दाणे फुकट दळून देणे, दुसऱ्याचे घर सारवणें, दुसऱ्याची धुणी धुणें, दुसऱ्याच्या घरी पाणी भरणें या सारखीं कामें तर पुष्कळांना करतां येतील मात्र अशी कामें करतानां ज्याचीं आपण अशीं कामें करतो ती व्यक्ति पण अशाच कोणत्या तरी रीतीनें दुसऱ्याचे उपयोगी पडते कीं नाहीं हे पहावे व तिला तसे करायला लावावे. धर्मार्थ सूत काढणें,

कपडे शिवणें, कापड विणणें, तयार जिनसा घरोघर नेऊन विकणें अशा किती तरी रीतिनीं एकमेकांनां एकमेकांच्या उपयोगी पडतां येईल. शेतांत जाऊन काम करणें, देऊळ झाडून स्वच्छ ठेवणें, तेथें पोथी पुराण वाचणें, गावांतील रोगी, अनाथ याची विचारपूस करणें, रस्त्यातील दगड उचलून टाकणें, त्यांत पडलेले खड्डे बुजणें, देवळावर उगवलेले गवत काढणें वगैरे कामें पण करतां येतील. आपला देश दरिद्री होत चालला आहे अशा वेळीं प्रत्येक स्त्री, पुरुष, मूल यानीं जर त्यासाठीं रोज कांहीं तरी करण्याचा नियम केला तर वर्षाकांठीं लोकांना आश्चर्य वाटेल इतकें काम होईल अशा रीतीनें प्रत्येकजण परोपकार करणें साठीं झटू लागला तर हे 'कलीयुगच' राहणार नाहीं तत्काळ हे 'कृतयुग' होईल. जो तो आपापले कर्तव्यकर्म नीट करीत आहे असा जो काळ त्याला कृतयुग म्हणतात.

असो कृतयुग करण्या इतक्या पल्याला जरी आपण आजच गेलो नाहीं तरी रोजच्या व्यवहाराच्या दृष्टीनें पुरुषानें जसे पंचमहायज्ञ करावयाचे तसें बायकानां काय करायला येईल हे आपण पाहूं शास्त्रकार बायकोला पुरुषाचाच एक भाग समजतात म्हणून त्यांनीं बायकां करतां पंचमहायज्ञाची व्यवस्था सांगितलेली नाहीं पण बायकांनां कशा प्रकारे यज्ञ करतां येतील हें मी वर सांगितलेच आहे व घरांतले घरांत त्यांना स्वतः काय करतां येईल हें आपण पाहूं. स्वयंपाक करतानां कांहीं धान्याचें दाणे चुलींत टाकणें हा एक बायकांनीं करावयाचा वैश्वदेवच आहे धान्य निवडतानां, पाखडतानां, चाळतानां, चिरतानां वगैरे जो निरुपयोगी धान्याचा भाग निघतो तो केरांत किंवा उकीरड्यांत न टाकतां तो कोणातरी गुराढोराचे पोटांत जाईल अशी व्यवस्था करणें हें पंचसुना दोषासाठीं केलेल्या प्रायश्चिता सारखेच आहे. घरांतील काम स्वतः मन लावून करणें हा सुद्धां यज्ञच आहे. बायको घराला चांगली जपत असली तर नवऱ्याचे हातून तितक्याच उत्पन्नाचे जास्त काम होईल व या जास्त कामाचे श्रेय बायकोला आहे व म्हणूनच नवऱ्याचे अर्धे पुण्याची बायको

वांटकरीण शास्त्रकारांनीं ठरविली आहे. पुरुषाचे हातून गृहस्थ धर्मांत जे पुण्यकर्म घडते तें त्याला बायको आहे म्हणूनच घडतें. बायको असल्यामुळें त्याची पुष्कळ मेहनत व दगदग वाचते व त्यामुळें त्याला आपली ही वाचलेली शक्ति दुसऱ्या कामाकडे लावतां येते. बायकोमुळें तो पुष्कळ दुर्व्यसनापासून अलिप्त रहातो व यामुळें पण त्याचे पुष्कळ द्रव्य वाचते व ते त्याला सत्कार्माकडे लावतां येतें. यासाठीं आपल्याला पंचमहायज्ञ सांगितले नाहींत म्हणून वाईट वाटणेचे कारण नाहीं. त्यांनीं आपले घरकाम उत्तम प्रकारें केलें म्हणजे नवरा करतो त्या पुण्यकर्मावर त्यांचा हक्कच उत्पन्न होतो. मुलांची जोपासना करणें, त्यांच्यासाठीं खस्ता काढणें, त्याना शिक्षण देणें हीं कामें बायकांना करावयाची असतात व त्यांत पण त्यांच्या हातून यज्ञ घडत असतो गर्भधारण करणे हा सुद्धां यज्ञच आहे.

हिंदीशास्त्रकार होताहोईतो आपले काम दुसऱ्यास सांगू नये या मताचे आहेत. शिष्य किंवा सेवक यानें न सांगतां मनांतला आशय ओळखून मुकाट्यानें काम करावें असें शास्त्रकारांचें सांगणे आहे. अशा रितीनें काम करण्यांत गुरुवरील प्रेम दिसते, त्याशी झालेले तादात्म्य पण उघड होते व चाणाक्षपणानें परक्याचे मन ओळखण्याची शक्ति येते. सांगितल्यावर काम कोणीही करील इतकेंच नव्हे तर सांगितल्यावर जो न करील तो पापी किंवा शिक्षेला पात्र असें ते समजतात व यासाठीं गुरुचे मनोगत ओळखून त्यांनीं सांगण्यापूर्वीच त्यांचे काम करावे असा सेवाधर्म ते सांगतात. नवरा बायकोनें एकमेकांशी बोलावयाचें नाहीं या निर्बंधाचा पण हेतु हाच. नवरा बायकोचे इतकें चेतादात्म्य झालेले असावे कीं न सांगतां एकमेकांना एकमेकांचे मनोगत समजावे व लहानपणा पासून एकमेकांचे सहवासानें असे मनोगत बराबर ओळखतां येते असा अनुभव आहे. याप्रमाणें एकमेकांशीं न बोलतां अगर खुणा करतां सर्व व्यवहार सुरळीपणे चालवणारी नवरा बायकोच त्या नांवाला योग्य होत.

'अर्धभार्या पुरुषस्य' पुरुषाची बायको ही अर्धे शरीर किंवा अर्धांगी म्हणतात याचा अर्थ हाच. उजव्या हाताचे मदतीस जाण्यासाठीं जसे डाव्या हाताला हुकुम द्यावा लागत नाहीं किंवा डोळ्याला जपणेस जसें पापणीस सांगावयास नको तसे नवऱ्याच्या सुखासाठीं बायकोला अगर बायकोचे सुखासाठीं नवऱ्याला झट म्हणून सांगणेची जरूर नाहीं या शिवाय कांहीं गोष्टी बोलणेच अवश्य असेल तर त्या बोलण्यासाठीं एकांत हा त्याना सांगितला आहेच. तात्पर्य बारीक लक्ष ठेऊन चाणाक्षपणें आपला नवरा किंवा वडील माणसे यांचे मनोगत ओळखून बायकांनीं वागावे. आई अशा रितीनें वागत असली म्हणजे मुले पण तसेच करतात नवरा घरांत येतांच जी त्याचे सेवेसाठीं निःस्तब्ध होते तिच्या मुलाना 'बाबा आले गप्प बसा' असे सांगावे लागत नाहीं. जन्मापासून तिच्या जवळ वाढल्यामुळें तिच मौन, मुलें आपोआप शिकतात व दुसऱ्याचे मनाचा विचार करणेची संवय त्यांनां आपोआप लागते. नवरा बायकोची गोष्ट बाजूला ठेवली तरी धनी व चाकर आणि वरिष्ठ व कनिष्ठ अधिकारी यांत सुद्धां अभ्यासानें मनोगत ओळखण्याची कला साध्य होते मी नोकरी करीत असतानां असा अनुभव मला पुष्कळ वेळा आला आहे व याबद्दल माझे वरिष्ठाना आश्चर्य पण वाटले आहे. कित्येक वेळा तर 'आम्ही सांगणे पूर्वीच तूं हें कसे ओळखलेस' किंवा गेले खेपेस मी तुला असें करणेस सांगणारच होतो तोंच तूं हें कसे केलेस" असे प्रश्न त्यांनी मला केले आहेत. त्यांचे चेहऱ्याकडे पाहत असतानां त्याच्या मनांतील विचार मला समजत इतकी गोष्टमात्र खरी. नीट लक्ष ठेवल्यानें थोड्या सहवासानें जर असें मनोगत जाणतां येते तर जेथें जन्माच्या गांठी पडल्यानें अगदीं तादात्म्य झाले तेथें न सांगतां सर्व व्यवहार बरोबर चालावा यांत कसले आश्चर्य पण इंग्रज लोकांचे सहवासाने अलिकडील नवरा बायको मोकळेपणे एकमेकांशी बोलूं लागली व त्यामुळें त्यांची मनोगत ओळखण्याची शक्ति गेली इतकेच नव्हे तर सांगितलेली गोष्ट पण त्यांच्या लक्षांत रहात नाहीं.

म्हणून एवढ्या करितां मुलीनीं गप्प राहून नीट लक्ष ठेऊन दुसऱ्याचे मनोगत ओळखुन कामें करणेची संवय ठेवावी. सांगण्यापूर्वींच काम करावे निदान सांगितल्यावर तरी त्यांत चूक करूं नये या एका गोष्टींत त्यांचे सर्व यज्ञ आले. ही गोष्ट ह्मणजे पतिचरणी आत्मयज्ञ होय. व असें आत्मयज्ञ करणारी स्त्री आपोआप सती होते. काशीयात्रेस जातानां नवरा आजारी पडला हे घरीं आपोआप जाणून आजारी पडणारी व तो मेल्याचे पत्र घरीं येणे पूर्वींच तो मेला हे जाणून देह ठेवणारी स्त्री मला ठाऊक आहे व हें ज्ञान तिला एकनिष्ठ पतिसेवेनें प्राप्त झालें असें ती ह्मणे व माझा पण अनुभव तसाच आहे. या प्रमाणें मनोमन साक्षित्वाचा अनुभव नवरा बायकोंस येऊं लागला ह्मणजे त्यांचे वादविवाद खटके वगैरे गोष्टी आपोआप बंद होतात. नवऱ्यांचे मनोगत बायकोला कळले व तिचे त्याला कळले ह्मणजे आपोआपच तडजोडीचे वर्तन त्यांचे हातून होते,

या प्रमाणें दुसऱ्याचे मनोगत जाणून त्याची सेवा करणे हा तपोयज्ञ आहे व ही कला मुलाबाळानां शिकविणे म्हणजे योगयज्ञ होय. मुलें नेहमीं आईबापांचे अनुकरण करीत असतात. शंभर उपदेशाच्या गोष्टी व एक उदाहरण यांत उदाहरणाची किंमत मोठी आहे. " बाबा घरांत नाहींत ह्मणून सांग " असे मुलाला सांगितल्यावर त्यापुढें सत्य व्रताच्या वाटेल तितक्या गोष्टी सांगून कांहीं उपयोग नाहीं. उलट तोंडानें बोलणें व प्रत्यक्ष करणे यांत असेच अंतर पाहिजे असे मुलगा या गोष्टी पासून शिकतो. यासाठीं आई बापानीं आपलें वर्तन फार स्वच्छ ठेवलें पाहिजे व असें वर्तन ठेवणें हा एक मोठा यज्ञच आहे. मुलांनां चांगलें वळण लावणें , त्यांनां योग्य कित्ता घालून देणें त्यांनां उत्तम शिक्षण देणें हा एक मोठा स्वाध्याययज्ञच आहे. मुलांनां नुसते लिहायला वाचायला शिकविणें किंवा परवांचा ह्मणून घेणें ह्मणजे शिक्षण नव्हे. त्यांनां चांगली चालरीत लावणें, लोकांत कसें बसावें, कसें बोलावें, कसें वागावें हें त्यांस शिकविणें ह्मणजे शिक्षण. पुष्कळ लिहायला व वाचायला येण्यापेक्षां या

आचरणाची, सद्वर्तनाची, वागणुकीची किंमत फार आहे. लिहिणें वाचणें म्हणजे नुसते रुपयाच्या आकार व आवाजा सारखे आहेत. साधारण लोक यावरच माणसांची व रुपयाची किंमत करतात पण खरे परीक्षक हे माणसाचे आचरणावरून व रुपयाची कसावरून किंमत करतात. चकचकीत दिसला व छगछण वाजला ह्मणजे रुपया खरा नव्हे, जो चांदीचा कस बरोबर देईल तो रुपया खरा. तसेच जो सभ्य गृहस्थासारखा पोषाक करतो, सभ्य गृहस्थासारखी भाषा बोलतो तो सभ्य गृहस्थ नव्हे तर जो सभ्य गृहस्था सारखा वागतो तो सभ्य गृहस्थ. राजासारखा पोषाक करणे राजाची भाषा बोलणें या गोष्टी राजाचे आचरणापेक्षां फार सोप्या आहेत व ह्मणून लबाड लोक लोकानां फसविण्यासाठीं या सोप्या गोष्टी वापरतात.

या प्रमाणें जगाचे उपयोगी पडणेंसाठीं आपले हातून होईल ते करणें, समाजांत वर्तन, लोकांनीं कित्ता घ्यावा, नमुना म्हणून गिरवावे असें ठेवणें, घरकामाची उत्तम व्यवस्था ठेवणें, वडील माणसे यांचे मनोगत जाणून त्यांनां बरे वाटेल असें वागणें, आपले सर्व जीवित नवऱ्याला सुख देणेंसाठीं वाहणें, नवऱ्याचे सुखानें सुखी व त्याचे दुःखानें दुःखी होणे, मुलानां चांगले वळण लावणें, त्यांना योग्य शिक्षण देणें त्यांना चांगली शिस्त लावणें ही यज्ञकर्मे बायकांनीं करणेंसारखी आहेत मनुष्याचीं किंमत तो कोणतें काम करतो यावर नसून ते काम तो कसें करतो याबर असते. वाईट राजा होण्यापेक्षां उत्तम शिपाई होणें लक्षपटीनें बरें. थोर म्हणजे जो थोरांना योग्य अशा रीतीनें वागतो तो. "परोपकारः पुण्याय पापाय परपीडनं" हे पाप व पुण्य यांचें थोडक्यांत लक्षण होय. दुसऱ्यांनां सुख देणें म्हणजे पुण्य व दुसऱ्यांनां दुःख देणें म्हणजे पाप. या सृष्टींत जिवात्मा व परमात्मा असें दोन मुख्य भाग आहेत. आपलें शरीर म्हणजे जीवात्मा व बाकी सर्व जग ह्मणजे परमात्मा. . यासाठीं परमात्म्याला किंवा परमेश्वराला प्रसन्न करणे अगर संतुष्ट करणें ह्मणजे जगाला संतुष्ट करणें होय जग हें आपले प्रतिबिंब होय. या प्रति-

बिंबाचे कपाळी गंध असावे असें वाटत असेल तर आपण आपल्या कपा- ळी गंध लावावे म्हणजे झालें. तसेच सर्व जग संतुष्ट व्हावे असे वाटत असले तर आपण आपल्या अंतरात्म्याला संतुष्ट केले म्हणजे झाले, या ठिकाणीं मेंदु व अंतरात्मा या मधील भेद लक्षांत ठेवला पाहिजे. आपले मन आपल्याला खात असतानां हंसरे तोंड करून आपण सुखी असल्याची प्रौढी मिरविण्यांत अर्थ नाहीं. उलट अगदीं सर्व बाजूनीं संकटानीं ग्रस्त झाले असतांना पण मन शांत व आनंदांत असणे यांत सर्व सुखें आली, यासाठीं आपल्या अंतरात्माला सुख म्हणजे सर्व जगाला सुख म्हणजे पर- मेश्वराला सुख होय व या प्रमाणें वागणें म्हणजेच उत्तम आचरण व थोर यज्ञ होय.

उपासना किंवा देवपूजा हा एक यज्ञाचाच प्रकार आहे. ज्या प्रमाणें मुलांनीं मारुतिला पाणी घालावे व प्रदक्षणा घालाव्या त्या प्रमाणें मुलींनीं तुळशीला पाणी व प्रदक्षणा घालाव्या. मारुति हे मुलांना उत्तम ध्येय आहे तसे तुळस हे मुलींनां उत्तम ध्येय आहे. ही तुळस फार उप- योगी आहे व हिचे सर्व शरीर देवाचे व लोकांचे उपयोगी पडते. हिचे काष्ठ पण देवापुढें वातींत जाळणेंत येते. मुलींनी पण असेच परोपकारी असावे व शेवटीं पतिदेवासाठीं आपले शरीर जाळून घेणेस राजी व तयार असावे तुळशीची चव रुचकर असून जरा तिखट असते तसेच मुलगी पण प्रेमळ असून किंचित पाणीदार असावी. तिचा उपमर्द करण्याची को- णाची छाती होऊं नये. तरुण स्त्रियासाठीं अन्नपूर्णा किंवा गौर हें उत्तम ध्येय आहे. भगवान् शंकराचा संसार अत्यंत गरीबीचा पण अन्नपूर्णेनें तो आपल्या तेजानें व पराक्रमाने उत्तम प्रकारे चालविला. अन्नपूर्णेचे त्या गरिब पतिवर इतकी निष्ठा होती कीं कुमारी--अवस्थेंत तिला महाविष्णु सारख्या संपन्न पुरुषानें मागणी घातली तरी ती झिडकारून अत्यंत कष्ट- दायक तप करून तिने शंकरच पति वरले. दाक्षायणी असतानां नवऱ्या- चा अपमान झालेला पाहून तिने यज्ञकुंडांत आपल्या देहाची आहुती दिली

असा देह अर्पण करणारे दाक्षायणीचें नांव सती होतें व त्यावरून नव-
ऱ्यासाठीं देहत्याग करणारे स्त्रीस सती हें नांव पडलें आहे व अशा देह
त्यागाला सती म्हणतात. तरुण पुरुषांनां जसें सूर्य हें सर्वोत्कृष्ट ध्येय
आहे त्या प्रमाणें तरुण स्त्रियांनां गौर किंवा अन्नपूर्णा हें उत्तम ध्येय आहे.
व हें ध्येय लग्नाचें वेळीं गौरीहराची पुजा करणेस सांगून मुलीपुढें मांडणेंत
येते. संपन्न नवऱ्यावर कोणीही प्रेम करील पण गरीब दरिद्री नवऱ्यावर
एकनिष्ठपणे प्रेम करणे यांतच थोरपणा आहे. इंग्रजींत अशी एक म्हण
आहे कीं दारिद्र्य, दारांतून आंत डोकावूं लागले कीं प्रेम खिडकीतून बाहेर
पडते व ही स्थिती पाश्चात्य समाजांत खरी असेल, पण आपल्या हिंदी
समाजांत मात्र तसे नाहीं. विपत्तिचें ढग आले, संकटांचा वर्षाव होऊं
लागला, दुःखाचे कडकडाट चालले असले म्हणजे हिंदी स्त्री आपल्या
पतीला जास्तच घट्ट चिकटते. ती त्याला इतकी घट्ट बिलगते कीं दैव-
वशात् त्याला उभा चिरला तर त्याची छकलें ती विसकटूं देत नाहीं.
छिन्नभिन्न झालेला तो गृहस्थ पत्नीच्या आधारावर आपले जागीं अचल उभा
असतो. द्रौपदी, सीता, तारामती, सावित्री, या ज्या आमच्या बायकांच्या
ध्येयमूर्ती आहेत त्या अशाच बायका होत्या व हेंच ध्येय वेदकालापासून
आमच्या बायकापुढें आहे. संपन्न स्थितींत त्या कधींकाळीं लक्ष्मीसारख्या
चंचल असतील पण विपन्न स्थितीत त्या केव्हांहि दगा देणार नाहींत.
तरुण स्त्रियांनीं यासाठीं अन्नपूर्णा अगर गौरीची पूजा करावी व ते ध्येय
आपलें पुढें ठेवावे. पोक्त पुरुषानां ज्या प्रमाणें शेषशायी हें उत्कृष्ट ध्येय
आहे त्या प्रमाणें पोक्त स्त्रियांनां महालक्ष्मी हें ध्येय आपल्या शास्त्रकारानीं
ठेवले आहे. शेषशायी भगवान् जसें भक्तासाठीं धावून जाऊन त्याला सर्व संक-
टापासून सोडविणेंत तत्पर तशीच जगदंबा पण होय. जगदंबा ही अत्यंत
पराक्रमी माता असून ती भक्तासाठीं धावून येणारी आहे हें तिचे नांवच
सांगते. प्रेमी स्त्रीपुरुषासाठीं मुरलीधर हें उत्तम ध्येय आहे. मुरलीधर ही
मूर्ती प्रत्यक्ष प्रेमच आहे म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. मुरलीधर

भगवानांची, झाडें, जनावरें, गाई, मुलें, मोठी माणसे यांवरील प्रेमाच्या कथा जितक्या सांगाव्या व ऐकाव्या तितक्या थोड्याच. ती मूर्ती इतकी मऊ आहे कीं तिला थोडासुद्धां ताठपणा नाहीं. एवढीशी बालमूर्ति पण ती किती ठिकाणी वाकलेली. सरळपणानें आपण कोणाला तरी बोचूं असेच तिला वाटते कीं काय कोण जाणे. हे ध्येय प्रेम—पूर्ण माणसांनां उत्तम आहे. पुत्रवत्सल स्त्रीसाठीं रांगतां बालकृष्ण हे पण उत्तम ध्येय आहे. ती मूर्ती पाहून आईला पुत्र प्रेमाचे भरते येते. त्याच्या त्या बाल लीला आठवतां व स्मरतां तिला संसाराचे भान नाहींसे होते. यशोदेशी त्या माऊलीची घटकाभर तद्रूपता होते. आपण यशोदाच आहोत व भगवान् बालकृष्णाला नानाप्रकारे खेळवित आहो असे तिला वाटते. याप्रमाणें पोक्त बायकांचे मनःस्थिती प्रमाणे त्याना तिन ध्येय शास्त्रकारांनीं ठेवलीं आहेत. ज्ञात्याच्या पुरुषासाठीं जसे भगवान् ध्यानस्थ शंकर हे ध्येय आहे तसे ज्ञात्याच्या स्त्रियासाठीं विठोबा रखमाई हे ध्येय आहे. कमरेवर हात ठेवून सर्व संसाराचा खेळ त्रयस्थाप्रमाणें निर्विकार मनानें पहाणेस हे ध्येय शिकविते.

आपल्या शास्त्रकारांचा " हरिर्भूत्वा हरिंभजेत् " किंवा " ज्याचे जया ध्यान । तेच होय त्याचे मन " हा सिद्धांत आहे व यासाठीं त्याची पूजा करतां करतां आपण तोच होऊन जावे असें त्यांचे सांगणे आहे. उपासना ह्मणजे उप जवळ व आसन बसणें. ध्येयाचे जवळ बसणे, पायापाशी बसणें, त्याचे यथाशक्ति अनुकरण करणें असा अर्थ आहे. म्हणून जो माणू ज्या स्थितींत परिस्थितींत, मनःस्थितींत असेल त्या स्थितीला धरून त्याला तद्रूप होतां येईल असे ध्येय शास्त्रकारानीं ठेवले आहे. यामुळें त्या इसमाच मन त्या ध्येयाचे ठिकाणीं रमते, त्याचे चिंतन करणेंत त्याला आनंद वाटतो व कालांतरानें त्याचे तेथेंच लय लागून तो तद्रूप बनतो. स्त्रियांनीं कोणत्या मूर्तीची पूजा करावी हें वर सांगितलेच. या शिवाय पुरुषांचे ध्येयापैकीं पण कांहीं ध्येयें त्यांनीं घेण्यासारखीं

आहेत. उदाहरणार्थ भगवान् शेषशायी, श्रीराम, श्रीकृष्ण हीं संसारी ध्येयें सर्व गृहस्थांना तशीच गृहीणींनां अनुकरणीय आहेत. आपल्या धर्मांत मूर्तीपूजा सांगितली आहे ती, मनुष्याचे बुद्धिला परमात्म्याचे आकलन व्हावे म्हणून होय. निर्गुण परमात्मा हा वाणी व मन यांनां सांपडत नसल्यानें बहुजन समाजाच्या तो उपयोगी पडत नाहीं. निर्गुण म्हणून त्याना कांहीं तरी सगुण सकार मूर्तिंचेच ध्यान करावे लागते व यासाठीं ज्याला जो गुण प्रिय असेल त्या गुणाला अनुरूप अशी मूर्ति घेऊन त्यानें तिच्य उपासनेत मनाला रंगवावे व मग सर्व मूर्ति त्या परमात्म्याच्याच अंशभूत आहेत असें जाणून निर्गुणांत शेवट करावा असा हिंदु धर्माचा कटाक्ष आहे. परमात्मा निश्चल आहे खरा पण हे त्याचे निश्चलत्व मनास पटण्यासाठीं, अनुभवांत उतरणेसाठीं अनेक कमी जास्त चंचल वस्तूंचे ध्यान व विचार केला पाहिजे. चंचलत्व कमी करीत करीत स्थूलापासून सूक्ष्माकडे जावे. भाववाचकनामें करीत एक एक गूण सोडीत सोडीत अगदीं परिचित वस्तूपासून निर्गुणाकडे जावे व त्यांत सर्व उपासना संपवावी असें हिंदुधर्म म्हणतो.

**भोग**—स्त्रियांचे व पुरुषांचे भोग पुष्कळसे एक आहेत. अन्नखाणें पाणी पिणें, कपडेलत्ते वापरणें, झोंप घेणें, खेळणें वगैरे भोग दोन्हीकडे सारखेच असल्यामुळें या बाबतींत पुरुषाचे भोगाकडे पुष्कळ हवाला द्यावा लागतो. जे भोग पुरुषांनां हितकर तेच स्त्रियांनां पण हितकर होत. सबब या भागांत स्त्रियांच्या विशेषाचेच विवेचन करणेंचे योजिलें आहे. स्त्रिया ह्या स्वभावत: सौंदर्यप्रिय असतात. सृष्टीच्या प्रारंभापासून जड वस्तू पासून सर्व चौऱ्यांयशीलक्ष योनींत पुरुषांची भर साहस व शक्तियर व स्त्रियांची भर नाजुकपणा व सौंदर्यावर. जडसृष्टींत पाणी हे पुरुष स्वरूप असून जमीन हे स्त्री स्वरूप आहे. अगदीं प्रारंभी निर्विकार परमात्मा हे पुरुष स्वरूप असून सृष्टी किंवा प्रकृती ही स्त्री स्वरूप आहे पण निर्विकार परमात्म्याचे रूप गुण सांगतां येत नसल्यानें या जोडप्याचा विचार

सोडून आपण जल व स्थल या पासून सुरवात करून जल व स्थल किंवा पाणी व जमीन या जोडीत पाणी जास्त चपल व शक्तिमान आहे हे समुद्र किनाऱ्यावर घटकाभर बसले तर सहज समजेल समुद्राच्या त्या उंच उंच लाटा, त्यांचे ते एकामागे एक धावणे व जमीनीवर येऊन धाडकन आपटणे पाहिले व जमीनीच्या स्तब्धपणाकडे आपण लक्ष दिले ह्मणजे पुरुष व स्त्री या मधील भेद आपणांस स्पष्ट समजतो. तसेच जमीनीचे ते नानारंगाच्या मिश्रणानें आलेले सौंदर्य व समुद्राचा तो एकरंगीपणा पाहिला ह्मणजे पण पुरुष साधा व शक्तिमान् व स्त्री सुंदर पण शांत कशी असते हें आपणांस समजते. पुढें वनस्पतींत पण पुरुष केसरांचे ते एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं कशा बरोबर तरी जाणे व स्त्री केसरांचे ते एका ठिकाणी बसून रूप, रंग, वास, मध वगैरेने पुरुषाना घेऊन येणाऱ्या प्राण्याना ओढून घेणे पाहिले म्हणजे पण पुरुष व स्त्री यांतील भेद स्पष्ट होतो. पशु, पक्षी यांत पण हें गुण आपणांस दिसतात. स्त्री साठीं होणाऱ्या अनेक झुंजी पाहिल्या म्हणजे पुरुषाचे साहस व शौर्य स्पष्ट होते व स्त्रियांचे सौंदर्य, आवाज, रंग वगैरेचा तसाच परिपोष झालेला दिसतो. या प्रमाणें चौऱ्यायशीं लक्ष योनींतून अंगवळणी पडलेले गुण मनुष्यामध्यें पण उपजत असावे यांत आश्चर्य कसले, स्त्रिया या प्रमाणें साहजीक सौंदर्यप्रिय व नाजूक असतात व पुरुष साहसी व शक्तिमान् असतात. शक्तिमान् व साहसी पुरुषाचे ठिकाणीं न्याय निष्ठुरपणा व स्त्रियांचे ठिकाणीं प्रेमळ दया असणे पण तसेच अपरिहार्य आहे व या भेदा वरच सर्व स्त्री पुरुषांचे आचार भेद रचलेले आहेत. स्त्री व पुरुष सम-समान आहेत असे म्हणणारांनीं या पूर्वपरंपरेचा नीट विचार करावा म्हणजे तें जो घोंटाळा समाजात माजवीत आहेत त्याबद्दल त्यांनां खेद वाटेल. स्त्रियांचे भाग या प्रमाणें नाजूकपणाचें व सौंदर्याला पोषक असे लागतत. त्यांचे वस्त्र, पात्र, अलंकार, केशरचना बोलणें, चालणें वगैरे सर्व गोष्टी नाजूक व सौंदर्ययुक्त असाव्या लागतात. स्त्रियांनां साधारणपणे

नेहमी दोन जीवांचे पोषण करावें लागते ह्मणून त्यांचा आहार पुरुषांचे आहारापेक्षां जास्त असावा लागतो व गर्भधारणेसाठीं पोटांतील जागा असल्यामुळें या जास्त आहाराचे पचनासाठीं त्यांची बरीच शक्ति खर्च होते व ह्मणून त्या शारिरीक व बौद्धिक शक्तित पुरुषापेक्षां कमी असणे साहजीक आहे. स्त्रियांचा या प्रमाणें नटणें, मुरडणे, कडे साहजीक प्रवृत्ति असते व त्यामुळें ज्याला हे लाड पुरविता येत नाहींत अशा पुरुषावर त्यांचे प्रेम कमी बसते. लहान मुलींना हें लाड पुरविणारा बाप अगर भाऊ आवडतो, मोठ्या पोरीचे हे लाड पुरविणाऱ्या सासऱ्यावर अगर नवऱ्यावर प्रेम असतें, पोक्त बायकांना हे लाड पुरविणारे नवऱ्याचें किंवा मुलाचे कौतुक वाटते. या नटणें वगैरे पायींच घरांत मायलेकी किंवा सासुसुना किंवा नणदा भावजया किंवा जावाजावा यांचे खटके उडत असतात.

अशी ही दागदागिन्याची, नटण्यामुरडण्याची प्रवृत्ति स्त्रियांत साहजीक आहे तरी तिच्या पासून व्यवहारांत फार त्रास होतो, संसार सुखाचा होणे कठीण जाते म्हणून या प्रवृत्तिला लहानपणापासून आळा घालणेस, तिला कमी करणेस शास्त्रकार सांगतात. व हा आळा प्रेमाचे आधारानें घालावयाचा असतो. स्त्री ही जशी नाजुक व सौंदर्यप्रिय आहे त्याच प्रमाणें ती प्रेमळ आहे. तिचे कोणी तरी लाड करावे असे जितके तिला वाटते तितकेच तिने कोणाचे तरी लाड करावे असें तिला वाटते. आपल्या नटण्या मुरडण्याच्या, दागदागिन्याच्या हौशीमुळें आपल्या प्रेमाच्या माणसांना फार श्रम पडतात, त्यांच्या जिवाला वाईट वाटते या जाणिवेनें तिने या आपल्या हौशी जरा दाबून धरल्या पाहिजेत. पाश्चात्य समाजांत गांधर्व विवाह प्रचलित असल्यानें स्त्रीची मर्जी संपादन करणेसाठीं अनेक पुरुष झटत असतात व त्यामुळें हौशीला आळा घालणे बाजूस राहून नाना चोचले करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते व त्या समाजाचे तारूं शेवटीं याच खडकावर फुटणार आहे. आपण गांधर्व विवाहाचे पलिकडे

ब्राह्म विवाहाला गेलो आहोत व त्यामुळें लहानपणापासून आपली परिस्थिती जाणून त्या प्रमाणें आपल्या आकांक्षा व नटणें मुरडणे स्त्रियांनां मर्यादित करतां येते. त्यांचे लाड झाले तरी ते परिस्थितीच्या मानानें होतात. त्यांची मर्जी संभाळणेसाठीं जिवापाड कोणी मेहनत घेत नसतो व कोणी घेत असल्यास त्याला कमी मेहनत पडावी असें बायकांचे प्रेम त्यांना सांगत असते. याप्रमाणें ही नटणें मुरडण्याची दागदागिन्यांची हौस मर्यादेत ठेवणेस आपल्या चालीरिती फार सोईच्या आहेत व यामुळें खरे संसारसुख पाश्चात्य समाजापेक्षां आपल्या समाजांत जास्त मिळते. पाश्चात्यांच्या संसर्गानें आपण आपल्या जुन्या चालीरिती सोडीत चाललो आहोत ही आपली मोठी चूक होत आहे. त्यांच्या. समाजाचे बारीक निरीक्षण करून त्यांत खरें सुख आहे असें अनुभवास येईपर्यंत तरी आपण आपल्या गोष्टी सोडूं नयेत पण अनुकरणेच्छेनें धुंद झालेल्या लोकांनां हें विचार सुचतच नाहींत.

दागदागिनें, वस्त्रप्रावरण, नटणे मुरडणे या बाबींत जरी प्रत्येक स्त्रीला सारखेपणा नसला, यात जरी कमी अधिकपणा व विषमता असली तरी खऱ्या पतिसुखाचा प्रत्येकीला सारखाच अनुभव असतो. नंदनवनांत इंद्राला इंद्राणीबरोबर जितकें रतिसुख मिळते तितकेंच रतिसुख एका झोपड्यांत नुसत्या चटईवर एका गरीबाला मिळते व या सर्व समान सुखाचा प्रत्येक स्त्रीला पोटभर आस्वाद घेतां यावा म्हणून प्रत्येक मुलीचा विवाह झालाच पाहिजे असा शास्त्रकारांचा कटाक्ष आहे. पाश्चात्य समाजांत कितीतरी मुली लग्न न झालेल्या दिसतात यामुळें त्या अनुपम सुखाला त्या, मुकतात. आपल्या येथील विधवांची हीच स्थिती आहे खरी पण त्यांनां समाधानाला एक जागा आहे. विधवेचे बाप भाऊ म्हणतील " बाई तुझे आम्हीं लग्न करून दिले यानंतर संसारसुख भोगणे तुझे नशीबी नाहीं त्याला आम्ही काय करणार " व हे म्हणणे तिला पण पटेल. पण जिचे लग्नच झाले नाहीं त्या मुलीचे समाधान कोणी तरी कसे करणार.

उलट ती मुलगी म्हणणार कीं माझ्या मैत्रिणीची पांच पांच लग्ने झाली आणि मला तो संस्कार एकदा सुद्धां नाहीं व याप्रमाणें तिच्या मनांत हेवा मात्र उत्पन्न होणार. ज्या पाश्चात्य समाजाचे कित्येक इतके गोडवे गातात त्यांच्यात ही रड आहे व ही आपल्यांत पण यावी म्हणून त्यांची अविश्रांत खटपट आहे. यापेक्षां तरुण विधवांनी सती जाण्याचा आपला पूर्वीचा प्रचार कितीतरी इष्ट आहे व यासाठीं सर्वांनी झटायला पाहिजे. सती जाण्यांत मोठा क्रूरपणा आहे असें कित्येक म्हणतात पण असा क्रूरपणा पुष्कळ गोष्टींत आहे. रोग, दारिद्र, दुष्काळ वगैरे अनेक बाबींत जगांत दुःखे वावरतांनां आपण मुकाट्यानें पहातो व त्या अनेक दैवी आपत्तींपैकीच नवरा मरणे ही एक होय.

ज्या प्रमाणें सत्गुरु ब्रम्हसाक्षात्कार करून देऊन शिष्याला अनुपम सुखाची जोड करून देतात त्याच प्रमाणें पति आपल्या पत्नींनां अनुपम संसार सुखाची जोड करून देतात. या दोन बाबींत अतीशय साम्य आहे सत्गुरुवर ज्या प्रमाणें शिष्याचे पूर्णप्रेम, पूर्णविश्वास, व अनन्यत्व पाहिजे त्याचे प्रमाणें पत्नीचे पण पतिवर पूर्णप्रेम, पूर्णविश्वास व अनन्यत्व पाहिजे. दोघांची मनें एकमेकांशी पूर्ण मोकळी असल्याशिवाय खऱ्या संसार सुखाचा लाभ त्यांनां मिळत नाहीं. कोणत्याही कारणामुळें एक जर दुसऱ्या पासून आपले अंग चोरूं लागली तर दोघेही त्या पूर्ण सुखाला अंतरतात. मूल हे असें पूर्णसुख मिळाल्याचा दाखलाच आहे. ज्या स्त्री पुरुषानां मुलें झाली नसतील त्यांनी नीट आपले मनाची तपासणी करावी म्हणजे आपण आपले अंग कसें चोरीत होतो व त्यामुळें मुलें कशी झाली नाहींत हे त्यांचे प्रत्ययास येईल. मुलाची मुंज व नतर गुरु शुश्रुषा त्याच प्रमाणें मुलीचे लग्न त्यानंतर पतिशुश्रषा त्यांनां सांगितलें आहे. बायकांनीं आपल्या नवऱ्याशिवाय गुरु करूं नये असें शास्त्रकार सांगतात याचे कारण हेच कीं गुरुशी शिष्याचा जो मोकळेपणा असावा लागतो तो नवऱ्या शिवाय इतरांशी बायकांचा असणे शक्यच

नाहीं. नवऱ्याशी जितका एकांत, संभाषण वगैरे त्यांनां करतां येतो तितका एकांत, संभाषण वगैरेचा मोकळेपणा दुसऱ्या कोणाशींही करतां येणार नाहीं व असा पूर्ण मोकळेपणा असल्या शिवाय ईश्वरी साक्षात्कार सद्गुरुनां करून देतां येणार नाहीं. म्हणून शास्त्रकार स्त्रियांनां पतीचीच सेवा अत्यंत एकनिष्ठपणे करणेस सांगतात व त्यापासून त्यांना ज्ञान उत्पन्न होईल. ज्ञान उत्पन्न झाले तर त्यांचा उद्धार होईल अथवा मुलाच्या सद्वर्तनानें त्याच्या आईबापांचा उद्धार होईल असें दोन मार्ग शास्त्रकारांनी सांगितलें आहेत. मुलगा जर संन्यासी झाला तर त्याची आई त्याच्या योगानें तरुन जाते असें शास्त्र आहे.

प्रत्येक स्त्रीला, आपल्याला मुलें व्हावीं अशी इच्छा फार असते. सृष्टीनें स्त्री व पुरुष हे दोन भाग प्रजोत्पादन करून परंपरा कायम ठेवावी यासाठींच उत्पन्न केले असल्यामळें प्रजोत्पादनाची इच्छा या दोघांत प्रबळ ठेवलेली असावी हे साहजीकच आहे. पुरुषापेक्षां स्त्रियांनां प्रजोत्पादनांत जास्त कष्ट सोसावे लागतात व हे कष्ट सोसण्यास त्यांनी तयार व्हावे म्हणून पतिसुखाची इच्छा सृष्टीनें त्यांचे ठिकाणीं फार प्रबळ ठेवली आहे. स्त्री-पुरुष संयोगापासून पुरुषाला जितके सुख होते त्याचे आठपट सुख स्त्रियांनां होते असें शास्त्रकार म्हणतात. व प्रजोत्पादन कष्ट आनंदानें पत्करावे म्हणून ही सृष्टीची योजना दिसते. वर सांगितल्या प्रमाणें मूल म्हणजे अनुपम पतिसुख भोगल्याचा दाखला होय व यासाठीं त्याची फार किंमत आहे. मुलाला पाहिल्या बरोबर आईबापांनां त्या अनुपम सुखाची आठवण होते. मुलांत स्त्रीला पुरुषाची व पुरुषाला स्त्रीची प्रतिमा दिसते व यामुळें अस्सल वस्तु पुढें नसेल तेव्हां या नकलेवर अस्सल वस्तूची भूक आईबापांनां भागवितां येते. "अष्टपुत्रा सौभाग्यवतीभव" असा स्त्रियांनां आपण आशिर्वाद देत असतो तो पुरुषापेक्षां स्त्रीला पतिसुखांत आठपट सुख होते या गोष्टीवरच आहे. आठ मुले होईपर्यंत स्त्रीला पतिसुखाबद्दल आतुरता किंवा हौस असते व नंतर ती कमी कमीं होत

जाते तेव्हां आठ मुले होणें ह्मणजे पूर्ण पतिसुख, पोटभर पतिसुख, तृप्ती होईपर्यंत पतिसुख भोगणें होय व हें तुला असो असा त्या आशिर्वादाचा अर्थ आहे. 'पुत्रौ पुत्रश्च दुहिताच पुत्र या शब्दांत मुलगा व मुलगी या दोघांचाही अन्तर्भाव समास करतानां होतो असें अमरकोश सांगतो व अष्ट पुत्रा ह्मणजे आठ मुलें इतकाच अर्थ येथें विवक्षित आहे. स्त्रियांनां साधारणपणे पंधरा सोळा वर्षांच्या वयापासून मुलें होऊं लागतात व ती पन्नास वर्षे वयापर्यंत होणें शक्य असते. अगदीं लवकर ह्मणजे दीड वर्षांस मुल म्हटलें तर या पस्तीस वर्षांत एका स्त्रीला चोवीस मुलें होणें शक्य आहे. तात्पर्य एका स्त्रीला कमीत कमी आठ तरी मुलें व्हावी व जास्तीत जास्त तिला चोवीस मुलें होणें शक्य आहेत ही मुलांचे बाबतींत सीमा झाली. मुलांचे पूर्ण सुख ह्मणजे आठ मुलें झाली म्हणजे.

मुलांचें ते गोजिरवाणे रूप, त्यांचे बोबडे बोलणें, त्यांचे ते हंसणें खेळणें वगैरे पाहून प्रत्येक गृहस्थाला फार आनंद होतो. "आत्मावैपुत्रनामासि" पुत्र ह्मणजे आपला आत्माच होय ह्मणजे मुलाच्या रूपानें आपणच दुसरा जन्म घेतो असा या श्रुतीचा अर्थ आहे. सृष्टीचे जितके ज्ञान व्हावयाचे तितके झालें म्हणजे आपणाला सृष्टींत गोडी लागेनाशी होते व ही गोडी आपणास फिरून लागावी, आपण फिरून त्याच नादांत पडावे ह्मणून सृष्टीनें मुलांची योजना केली आहे. ज्या गोष्टींत आपणांस मजा वाटत नाहीशी झालेली असते त्याच गोष्टी मुलांच्या नादानें आपणांस गोड लागूं लागतात. अगदीं यःकश्चित गारोड्याचें खेळापासून तें नानाप्रकारची मजा पाहणें, पुस्तकें वाचणें, प्रयोग करणें या पर्यंत अनेक गोष्टींत मुलांनां मौज वाटते म्हणून आईबाप गढून जात असतात. आपण ज्ञान मिळवावे व तें दुसऱ्याना द्यावें ही सृष्टीची इच्छा व ती सिद्धिस जावी म्हणून मुलांनां नानागोष्टी दाखवाव्या, त्यांच्या बरोबर नाचावें, बागडावे, खेळावे, आपण ज्या गमती लहानपणी केल्या त्यांची उजळणी व्हावी. आपण ज्या चुका केल्या त्या आपल्या मुलांचे हातून होऊं नयेत ह्मणून

आपल्या अनुभवांचा त्यांना उपयोग व्हावा अशा अनेक कारणामुळें आई-बाप मुलांबरोबर मुलें होत असतात. अशा मुलांच्या सहवासांत मुलें हो णयानें संसाराला जो निरसपणा येऊं पहात असतो तो जातो. पहिल्यानें संसाराची गोडी स्वार्थाची असते, अमुक वस्तु मला पाहिजे असें वाटत असते तेथें या वेळीं संसाराची गोडी पदार्थाची लागते. अमुक जिन्नस माझ्या मुलांनां मिळावी असें आईबापांनां वाटते. मुलांनीं त्या वस्तुचा भोग घेऊन आनंद झालेला पाहिला म्हणजे आपण कृतकृत्य झालो असें त्याना वाटते.

पहिल्यानें संसारातील अनेक वस्तु आपण आपल्या भोगाकरीतां गोळा करीत असतो. पण पुढे आपल्या स्वतःला त्या भोगांत गोडी लागेनाशी होते व याच वेळीं आपणांस मुले होतात. मग मुलांसाठीं फिरून आपण तेच भोग संपादन करतो व मुलांनां त्यांचा भोग कसा घ्यावा हें शिकवितो व त्यांतच आपल्याला त्या भोगाचे उच्च सुख मिळत असते. परमात्मा ही सगळी सृष्टी त्याला कशाचीहि अपेक्षा नसताना कशी निर्माण करतो याचा अनुभव या ठिकाणीं आपणांस येतो. आपण जर आपल्या मुलाबाळांसाठीं निरपेक्ष रितीनें अनेक वस्तु मिळवितो व त्या, त्यांनां दिल्यावर जसा आपणांस आनंद होतो त्याच प्रमाणें परमात्मा आपल्या मुलांसाठीं अनेक वस्तु निर्माण करतो व त्यांचा त्या मुलांनी भोग घेतला म्हणजे त्याला बरें वाटतें हें आपणांस अनुभवानें समजते. आपण देवाची पूजा केली म्हणजे देवाला कसा आनंद होत असेल, नुसता नैवेद्य दाखवून देव कसा तृप्त होतो याचा पण अनुभव आपणांस या काळी येतो. आपल्या एका लहानग्यानें "बाबा हा घ्या तुम्हाला खाऊ" असें म्हटलें म्हणजे आपणांस किती तरी बरें वाटते आपण तो खाऊ न घेतां "खा तूंच" असें म्हणतो व तो त्यानें खाल्ला म्हणजे आपणाला तो खाऊ प्रत्यक्ष खाल्याइतकेंच सुख होते व हीच गोष्ट परमेश्वराची पण असेल असें आपणांस समजते. आपण परमेश्वरा पुढें ताट ठेवल्यावर "बाळ शाबास

खा बरं तूं हा प्रसाद " असें म्हणून तो परमात्मा आपणाला ते ताट कसें परत करतो हें अनुभवानें कळते. या प्रमाणें परमात्म्याचा चांगला परिचय होण्यासाठीं संसार करणें फार जरूर आहे. संसाराचा चांगला अनुभव असल्यावाचून परमेश्वर दयाळु, कसा, न्यायी कसा, व त्याच्या सर्व गोष्टीवरच सुख निरभिलाषपणें कशा चालतात हें आपणांस समजते. संसारातील मुलांबाळाचे सुख न भोगलेल्या इसमाला हें अनुभव जन्मज्ञान शक्य नाहीं.

सृष्टींत एक विधायक व दुसरी विघातक अशा दोन शक्ति सारख्या चावरत आहेत. यानांच स्थानपरत्वे निरनिराळी नांवे आहेत. विधायक शक्ति निरानिराळया वस्तु एकत्र करीत असते व विघातक शक्ति वस्तु विसकटून टाकीत असते. घरांत पण मोठी सज्ञान माणसे व लहान अज्ञान मुलें या रूपानें या शक्ति काम करीत असतात. सज्ञान माणसे नानावस्तू जोडीत असतात व अज्ञान माणसे नानावस्तु मोडीत असतात. सृष्टींत ज्या प्रमाणें घड व मोड सुरू असते त्याच प्रमाणें घरांत पण असते. मुलांनी जर नानावस्तु मोडल्या नाहींत तर वस्तु ठेवण्याला घर पुरणार नाहीं व मोठ्यानी जर नानावस्तु जोडल्या नाहींत तर लवकरच घर शून्य होईल. यासाठीं जोडणारी व मोडणारी अशा दोन्ही प्रकारच्या व्यक्ति घरांत पाहिजेत. व कोणच्या जातीच्या शक्ति जास्त आहेत हे पाहून आपण घराची स्थिती ओळखीत असतो. मोडणाऱ्या शक्ति फार झाल्या म्हणजे घर मोडकळीस येते व जोडणाऱ्या शक्ति फार झाल्या म्हणजे घर संपन्न होते. यासाठीं घरांतील अज्ञान घालवून ते संपन्न होत जावे म्हणून प्रत्येक व्यक्ती जोडणारी करावी. समजांत पण हाच नियम आहे. ज्या सपाजांत जोडणाऱ्या व्यक्ति जास्त तो संपन्न होतो व ज्या समाजांत मोडणाऱ्या व्यक्ति जास्त तो मोडकळीस येतो. यासाठीं सर्वांनी वस्तु जोडण्यासाठीं झटावे व मोड कमी करणेचा प्रयत्न करावा. खर्चांत सुद्धां पदर मोड चांगली नाहीं वर सांगितलें कीं आई बाप पहिल्यानें आपल्या उप-

भोगासाठीं नानावस्तु मिळवितात व मग पुढें मुलांचे उपभोगासाठीं तेच काम चालतें. इकडे आई-बाप जोडीत असतात तर तिकडे मुलें मोडीत असतात. पुढें आईबापांची शक्ति कमी होऊं लागली म्हणजे त्यांची जोडण्याची शक्ति कमी पडते व मग मुलें मोडतात हें बरोबर नाहीं असें त्यांना वाटूं लागतें. पण मुलें मुळीं मोडण्यासाठींच जन्माला आलेली, मग तीं मोडल्यावाचून थोडीच राहणार व मग आईबाप व मुलें यात विरोध उत्पन्न होऊन तीं एकमेकांस शाप देऊं लागतात व यामुळें घर लवकर मोडकळीस येतें.

आई-बाप व मुलें यांत या प्रमाणें विरोध उत्पन्न होऊन घराची नासाडी होऊं नये म्हणून शास्त्रकारांनी दोन मार्ग सांगितले आहेत. (१) आपली जोडण्याची शक्ति कमी होईपर्यंत त्यांनी मुलें उत्पन्न करीत राहूं नये. माणसाची साधारणपणें पन्नास वर्षे पर्यंत बरी शक्ति असते तर त्याने चाळीस वर्षें वय झालें म्हणजे प्रजोत्पादन बंद करावें व झालेली प्रजा नीट रितीनें संभाळावी म्हणजे वयाचे पन्नासावे वर्षीं जोडण्याची शक्ति कमी होते तोंच मुलांची पण मोडण्याची प्रवृत्ति कमी होते व या प्रमाणें जोडणे व मोडणे या दोन शक्तींचा मेळ राहतो. [२] ज्या दिवशीं असा विरोध येऊन घराचा कंटाळा येईल त्याच दिवशीं आईबापानी घर सोडून कोठें तरी तपोवनांत जावें. "यदहरेवविरजेत् तदहरेवप्रव्रजेत्" ज्या दिवशीं किंवा क्षणीं प्रजोत्पादनाचा कंटाळा येईल त्याच क्षणीं संसार सोडून कोठें तरी तपोवनांत जावें. असें केल्यानें जुनी पिढी व नवी पिढी यांचा विरोध येत नाहीं व एकमेकांस शिव्याशाप देण्यांत त्यांचे तपःसामर्थ्य पण खर्ची पडत नाहीं. ज्या तपःसामर्थ्याचे जोरावर ब्रह्मदेवानें सृष्टी निर्माण केली ते तपःसामर्थ्य अशा रितीनें आपआपसाचे नुकसान करणेंत खर्च करणे अत्यंत गैर व यासाठीं ज्यांनी आपले कर्तव्यकर्म केले अशा जुन्या पिढीनें बाजूस सरणेंच योग्य. पाहिल्यानें भोगांचा कंटाळा आला तेव्हां मुलांसाठीं भोग संपादन व त्यांचे सुखांत सुख मानणेची प्रवृत्ति

सुरू झाली हे ठीकच झाले. पण आतां मुलांना भोगाचा कंटाळा येऊन ते आपल्या मुलांसाठीं भोग भोगूं लागल्यावर म्हाताऱ्यानीं कोणासाठीं भोगाची इच्छा करावयाची. स्वतः झाला, स्वतः ची मुलें झाली व मुलांच्या मुलांसाठीं मुले भोग गोळा करीत आहेत मग म्हाताऱ्याचें काय काम आहे. यासाठीं म्हाताऱ्यांनी आपण होऊन राजिनामा देऊन संसारांतून मोकळे व्हावे व तपोवनांत आपल्या जन्माचे सार्थक करावे हेंच योग्य अशा तपोवन संस्था प्रत्येक जिल्ह्यांत एक तरी पाहिजेत.

**विश्रांति**—जसे मनुष्याला शौच, स्वार्थत्याग, काम, व जेवण वगैरे भोग अवश्य आहेत त्याच प्रमाणें त्याला विश्रांति पण अवश्य आहे व यासाठीं परमेश्वरानें रात्र निर्माण केली आहे. दिवसभर श्रम करून शरीर थकून गेलेले असते ते फिरून ताजेतवाने व्हावे यासाठीं ही विश्रांतिची योजना आहे. या विश्रांतिचे वेळीं सगळ्या जगाचा, संसाराचा विसर पडला पाहिजे म्हणजे विश्रांति चांगली मिळते. या करतां विश्रांति घेणेपूर्वी कांहीं तरी परमेश्वर व भक्त यांच्या कथा वाचाव्या किंवा ऐकाव्या व त्याचे चिंतन करीतच झोपी जावे. निजण्याची जागा स्वच्छ व मोकळी असावी ती स्वच्छ झाडून मग तीवर अंथरूण घालावे. अंथरूण घालतांना भिंतीपासून निदान वीतभर अंतर सोडून घालावें. मुंग्या, उंदीर, साप, विंचू वगैरे प्राणी बहुतकरून भिंतीचे कडेने जातात. त्यांचा उपद्रव आपणांस होऊं नये म्हणून वीतभर जागा त्यांचे साठीं सोडून हंतरूण घालावे निजताना एक काठी, पाणी भरलेले भांडे दिवा, आगपेटी वगैरे जिन्नस उशाशीं ठेवावे. ऐपत असल्यास बारीक दिवा ठेवून निजलेले वाईट नाहीं हंतरूण, पांघरूण हे कपडे स्वच्छ असावे. दिवसा वापरलेले हे कपडे नसावे व ते उन्हांत टाकावे म्हणजे त्यांचा मळ वगैरे जातो. निजताना बाहेरची मोकळी हवा खोलींत यावी अशी तजवीज असावी. मात्र ही हवा निजणारांचें अंगावरून वाहूं नये. निजण्यापूर्वी सर्व दारे खिडक्या नीट लावली आहेत असें पहावें. मुले बाळे उघडी असतील तर

त्यास पांघरूण घालावे व मग निजावें. बायकांनी सगळ्यांच्या मागून सर्व झांकपाक वगैरे पाहून निजावें व सर्वांच्या अगोदर उठावे. झोंप एक झाल्यानंतर पतिसेवा करावी. रोज पतिची सेवा त्याचे अंग रगडण्याचें रूपानें अवश्य करावी. या योगे एकांत घडतो, सुख दुःखाच्या गोष्टी बोलतां येतात, त्याच्या शरीर प्रकृतीची स्थिती, मनःस्थिती न बोलतां कळते असें अनेक फायदे आहेत. एक झोंप झाल्यावर थकवा जाऊन शरीर ताजेतवानें झालेले असते व त्यावेळीं सुखाचा उपभोग चांगला होतो. शिवाय पतिसुखांत पण श्रम होतात व हे श्रम त्यानंतर झोंप घेतल्यानें फिरून परिहारक होतात. पहाटे पतिसुख घेतल्यास या श्रमांच्या परिहाराची झोंप उशीरांपर्यंत लागते व उशीरापर्यंत निजण्याने शरीर व मन सुस्त होतें. शिवाय दळण दळण्यासारखे श्रम पहांटेस केले तर बरें असते मुळीच झोंप न घेतां पतिसुख घेतले तर शरीर थकलेले असताना जो गर्भ राहतो तो अशक्त. गर्भधारणा करणे हें एक मोठे महत्वाचें काम आहे व ते धकव्यांत करणे चांगले नाहीं. या गोष्टीकडे दुर्लक्ष घाल्यानेच हल्लीची पुष्कळ मुले जन्मतःच अशक्त होतात. या अशक्तपणाला अनेक दोष एकत्र झालेले आहेत त्यांतच हा एक आहे.

निजण्याचे खोलींत ओल, अडगळ, अंधेर, वगैरे असू नयेत. ओल असली तर रात्री तिच्या पासून वाईट वायू निघतात, नसता गारठा उत्पन्न होतो. कपडे वगैरे दमट होतात व त्यापासून शरीर प्रकृतीस अपाय होतो. अडगळ असली तर तेथें ढेंकूण वगैरेंना रहाणेस जागा मिळते व त्यापासून स्वस्थ झोंप लागत नाहीं. माणूस काम करून दमले असले म्हणजे त्याला ढेंकूण वगैरे चावलेले समजत नाहींत तरी त्याच्या शरीरावर त्यांचा परिणाम होऊन झोंपेनंतर जी हुशारी वाटावयाची ती वाटत नाहीं. खोलींत अंधेर असला म्हणजे तेथें डांस, चिलटें, पाकोळ्या वगैरेची वस्ती असते व यामुळें पण झोंपेस व्यत्यय येतो. यासाठीं घरांत मुद्दाम एक मोकळी जागा निजण्यासाठीं राखून ठेवावी. गरीबीमुळें घर दोंनच खो-

त्यांचे मिळाले असेल तर एका खोलींत सर्व जिनसा ठेवून एक खोली निजण्यासाठीं ठेवावी इतके या खोलीचे व विश्रांतीचे महत्व आहे. झोपी गेल्या वेळीं आपण जगांत पसरलेल्या अगाध इश्वरी शक्तितून शक्ति घेऊन खर्च झालेल्या शक्तिची जागा भरून काढीत असतो एकांतात देवाचे ध्यान करणें याने पण हेच काम होते. झोंपेनंतर, समाधीनंतर, मरणानंतर, सकाळीं, संसारांत लागतानां किंवा नवा जन्म घेतल्यावर जी हुशारी, जो जोम जो उत्साह दिसतो तो नव्या घातलेल्या भरीमुळेंच होय. अगदीं लढाइ सारख्या हातघाईचे वेळीं सुद्धां घठकाभर शांतपणें ईश्वरी ध्यान केल्यानें फार जोम येऊन पराक्रम वाढतो. असा अनुभव आहे. अर्जुनाला गीता सांगण्यांत भगवंतांनी हेच कार्य केलं. चिंता, क्लेश, वगैरेनीं झालेली झीज या प्रमाणें विश्रांतीनें भरून निघते व म्हणूनच दुखणेकऱ्याला सुद्धां संध्याकाळीं दुखणे जास्त होते व पहांटे बरें वाटते. दिवसभर आपण स्वत: व्यवसाय करीत नसलो तरी सर्व लोकांचे अनंत व्यवसाय चाललेले असतात व त्यांचा परिणाम डोळे, कान, वगैरे इंद्रियांचे मार्फत सारखा होत असतो व याचे उलट रात्रीं सर्वत्र शांत व सामसुम असल्यानें आपणांस स्वत: झोप न आली तरी हें परिणाम बंद होऊन पुष्कळ फायदा होतो.

विश्रांती प्रमाणेंच करमणुकीचे महत्व आहे. पण यासाठीं खेळ खेळणे बरोबर नाहीं. खेळांत नेहमीं दुसऱ्याला डाव येऊं नये व आपणांस यावा अशी वाईट बुद्धि असते यासाठीं खेळणे वाईट. या करितां गाणी म्हणावी, देवदर्शनासाठीं जावे हें चांगले. हिंदी रहाणींत साधारण बायकांना घरकामांतच पुरेसा व अनेक प्रकारचा व्यायाम होतो. दळणे, कांडणे, तक्ककरणें, पाणीभरणें, धुणीधुणें वगैरे कामांत पुष्कळ व सर्व शरीराला चांगला व्यायाम होतो यासाठीं ही कामें करणेस नोकर खरोखर जास्त काम असल्याशिवाय नयेत व साधारणपणे मोठे कुंटुंब असले तर त्या मानानें घरांत बायका पण जास्त असतात व यानाठीं नोकर ठेवणेची

जरूर नसते. नोकर ठेवल्यानें आपण व्यायामाला मुकतो हें नुकसान आहेच पण काम चांगले होत नाहीं हें मोठे नुकसान आहे. या शिवाय काम करणेंत स्वावलंबन, तपाचरण, कष्टाची सवय व मुलाबाळांना कित्ता घालून देणें हे फायदे आहेत ते निराळेच दुसरें महत्वाचें काम कोणी करीत असेल तर त्यांनीं नोकर ठेवणेंस हरकत नाहीं म्हणजे जास्त उपयुक्त काम केल्यानें हें दोष भरून निघतात इतकेंच. तात्पर्य साधी रहाणी व कष्ट करणें हें आपले ध्येय सोडूं नये.



## प्रकरण दुसरें

# सण.

मुलांसाठीं लिहिलेले दुसरें पुस्तकांत सणांची उत्पत्ती वगैरे देऊन पुरुषांचे सणाचे विवेचन केले आहे यासाठीं येथें फिरून सणांची उत्पत्ती व सणाचे दिवशीचें सामान्य कर्तव्य हें सांगत नाहीं या ठिकाणीं फक्त स्त्रियांचें सण त्या दिवशीचें कर्तव्य व त्यापासून घेणेचे धडे इतक्या गोष्टींचे विवेचन करणार आहे. स्त्रियांचें सण खालील प्रमाणें आहेत.

(१) गौर, (२) रामनवमी, (३) वटपौर्णिमा, (४) शिवामुठ, (५) मंगलागौर, (६) नागपंचमी, (७) कृष्णाष्टमी, (८) पिठोरी, (९) हरतालिका, (१०) ऋषिपंचमी, (११ ज्येष्ठाकनिष्ठा गौरी, (१२) महालक्ष्मी, (१३) वसुबारस, (१४) बहीण-तीज, [१५] तुलसीविवाह, [१६] भोगी, [१७] संक्रांत.

गौर—चैत्रशुद्ध प्रतिपदेपासून वैशाखशुद्ध तृतीयेपर्यंत अन्नपूर्णा देवी झोंपाळ्यावर बसवून तिचा उत्सव करावयाचा असतो. हा उत्सव सुरूं झाल्याचें लक्षण म्हणजे आंगणांत तुळशीपाशी रोज थोडी जमीन

सारवून तिजवर नानाप्रकारची रांगोळी काढणें हें होय. या योगे उन्हाळ्यांत सर्व अंगण सुशोभित केलें जाऊन, स्वच्छ होऊन, निजणे, बसणे, उठणेस योग्य होते. अन्नपूर्णा हें स्त्रियांचे उत्तम ध्येय असल्याचे पहिले प्रकरणांत सांगितलें आहेच. या माहिन्यांतील कोणत्यातरी एक दिवशीं हळदंकुकू वाटणेचा पण प्रघात आहे, या दिवशी गौर मांडतात व तेथें आपले ऐपती प्रमाणें थाट करतात. हा थाट म्हणजे स्त्रियांचे कौशल्याचे एक प्रदर्शनच आहे. गेल्या वर्षांत स्त्रियांनी काय केले याचा हा आढावाच आहे. यासाठीं स्त्रियांनीं दरसाल काहींतरी नवीन जिन्नस स्वतः करावी व या प्रदर्शनांत मांडावी. कोणती जिन्नस आपणांस करतां येईल, ती कशी करावी वैगेर माहिती दुसऱ्या गौरी पाहणेस गेल्यानें मिळावी अशी पण योजना यांत आहे. कोणी गरीब बायका असतील तर त्यांनी अशा जिनसा करून विकाव्या जिनसा करणेंस दुसऱ्या बायकांस शिकवावे असा पण याचा उपयोग आहे. या प्रमाणें ही चाल फार उपयुक्त आहे पण सर्व काळ बदलल्यामुळें या बाबींत पण ऱ्हास झाला आहे. हे प्रदर्शन हल्ली घरच्या किंवा निदान स्त्रियांच्या कौशल्याचे नसून इंग्रजी किंवा जपानी चित्रांचे प्रदर्शन झाले आहे. हे बदलून स्वदेशी कापड, स्वदेशी विणकाम वगैरे बायकांनी केलेल्या नव्हे प्रदर्शनाचे घरचें बायकांनी केलेल्या जिनसांचें हें प्रदर्शन होईल.तर त्यापासून फार फायदा होईल मनुष्य महत्वाकांक्षी व उत्सवप्रिय आहे ही गोष्ट खरी पण त्यासाठीं त्यानें परकी मालाचा आडत्या व्हावे हें चांगलें नाहीं. आपल्या देशांत, आपल्या बहिणींनी केलेल्या अनेक चांगल्या वस्तुंचा संग्रह करून, त्यांत शक्य ती भर आपण घालून, इतरांना त्याप्रमाणें करणेस उत्तेजन किंवा प्रोत्साहन देणें हेंच या वेळीं या कामीं बायकांनी करावयास पाहिजे. हळदीकुंकवासाठीं आलेल्या स्त्रियांनी त्या जिनसा पाहून ज्याची माहिती त्यांस नसेल ती माहिती विचारावी व मालकीणीनें ती सांगून त्यास तें काम शिकविणेचे कबूल करावे व शिकवावे म्हणजे अन्नपूर्णा प्रसन्न होऊन देशाला समृद्ध करील.

२ रामनवमी—रामनवमीचे सणाचे विवेचन मुलांसाठीं केलेल्या दुसऱ्या पुस्तकांत केलेंच आहे, आतां रामायणापासून स्त्रियांनीं काय बोध घ्यावा हें येथें सांगावयाचें आहे, रामायणांत स्त्रियांनीं ज्यांचा कित्ता घ्यावा अशा तीन स्त्रिया आहेत. अहिल्या, सीता, व मंदोदरी या त्या साध्वी होत.

अहिल्या—अहिल्येचे गोष्टीपासून शिकावयाची मोठी गोष्ट म्हणजे आपल्या हातून अजाणपणें सुद्धां पाप घडतां कामा नये व हें पाप अत्यंत सूक्ष्म गोष्टीपासून पण घडते. ब्रह्मदेवानें अहिल्येला उत्पन्न केल्यावर अगोदर पृथ्वी प्रदक्षणा करणे हा पण तिच्याबद्दल लावला होता. अहिल्येला इंद्र नवरा पाहिजे होता व अगोदर पृथ्वी प्रदक्षणा करील अशी तिला आशा पण होती. पण गौतम ऋषीनीं तो पण जिंकला व ती त्यांची धर्मपत्नी झाली. अहिल्येला लग्नापूर्वी इंद्र नवरा असाव असें जे वाटले होते त्याचा फायदा घेऊन तिला इंद्रानें फसाविलें. इंद्रानें गौतमाचें सोंग घेतल्यानें ती पहिल्यानें फसली व पुढें हा गौतम नव्हे असें तिला समजलें तरी आपल्या लग्नापूर्वीच्या इच्छेला ती बळी पडली व यामुळें तिला दगड होऊन पडावे लागले. अतिसूक्ष्म वासनेपासून कर्माचा उगम होऊन ते कसें वाढते व घात करते याचे हें चांगले उदाहरण आहे.

सीता—आपल्या नवऱ्याबरोबर खुषीनें राज्य सोडून वनवासांत जाण्याचे पत्करले याबद्दल सीतेची प्रशंसा करावी तितकी थोडीच होणार आहे. नवऱ्याचें सुख ते आपले सुख व नवऱ्याचे दुःख ते आपले दुःख हे स्त्रियांचें कर्तव्य तिनें उत्तम प्रकारें आचरून दाखविलें. ती वनवासांत लक्ष्मणाला अभद्र बोलली याबद्दल तिला पुष्कळ जण दोष देतात. पण विचार करतां तिला या बाबद दोष देतां येत नाहीं. लक्ष्मणाचा व सीतेचा संबंध गेली चोवीस वर्षे

होता व यासाठीं तिला त्याच्याबद्दल नसती शंका यावयास नको होती पण रावण जवळ आलेला असल्यानें त्याच्या मनापासून उत्पन्न होणाऱ्या लाटानीं सीतेचे मन कलुषित होत होते. तिला कसेसेंच वाटत असून असें कां वाटावें हें समजत नव्हते अशा वेळीं या चलबिचलींचे कारण लक्ष्मण असावा असें वाटणें साह-जीक होते. त्या ठिकाणीं लक्ष्मणाशिवाय दुसरा पुरुषच तिचे माहितीत नव्हता म्हणून 'मनोमनसाक्ष' या न्यायानें आपल्या मनाचे चलबिचलींचे कारण लक्ष्मण असावा असें वाटून तिनें त्याची निर्भर्त्सना केली व मग रावणास पाहिल्यावेळीं तिला आ-पल्या बोलण्याचे फार वाईट वाटलें. मनांत चलबिचल झाली तरी या प्रमाणें उतावीळपणें भलतेंच करूं नये हें यापासून शिकण्या-सारखे आहे. सीतेला पुढें टाकून दिल्याबद्दल लोक रामाला दोष देतात पण त्यांची सुद्धां तेथें चूकच होते. सीता अत्यंत मानी होती व परीट जी गोष्ट बोलला ती कर्णोपकर्णी सीतेच्या कानांवर येते. बायका आपआपसांत त्याबद्दल कुजबुजत्या व असे झालें असते तर सीतेने आत्मत्याग केला असतां व शेवटीं रामानीं तिला ती शंका सांगितल्या बरोबर तिने देहत्याग केलाहीं. या करितां रामानीं तिला टाकून दहा बारा वर्षें जास्त वाचूं दिले हे बरेंच केलें असें म्हणावें लागते.

**मंदोदरी**—मंदोदरी ही रावणाची बायको होती. रावणाला सीतेवर बलात्कार करण्याबद्दल किंवा तिला मारण्याबद्दल त्याला अनेक जणानीं शिफारस केली होती व त्याप्रमाणें तो करण्यास उद्युक्त झालाहि. पण वेळोवेळीं मंदोदरीनें त्याला सौम्य बोलून. उपदेश करून तसें करूं दिले नाहीं. नवरा वाईट फंदास लागला तर सौम्य शद्बांनीं, नानाउपदेशांनीं, हरप्रयत्नानीं त्याला त्यापासून परावृत्त करावे हें या गोष्टीपासून शिकणे सारखे आहे. मारुती लंकेत गेला होता त्या

रात्री सीता व रावण यांची गांठ पडल्यावेळीं मंदोदरीनें रावणास केलेला उपदेश व त्याचें मन वळवून ती त्यास तेथून परत घेनऊ गेली हा भाग या ठिकाणीं स्त्रियांनीं लक्षांत ठेवणे सारखा आहे.

**कैकई**—मंथरेचे नादी लागून कैकईची कशी फजीति झाली ही गोष्ट व कैकईचे रामानीं केलेले सांत्वन पण दाखला घेणे सारखं आहे. संबंध रामायणच नमुना घेण्या सारख्या प्रसंगानीं भरलेले आहे पण त्यांत वरचे प्रसंग विशेष लक्षांत ठेवणे सारखे आहेत.

३ **वटपौर्णिमा**—हा उत्सव ज्येष्ट शुद्ध पौर्णिमेस सत्यवानाचें मृत्यु दिवशीं करतात सावित्रीची कथा माहित नाहीं अशी मुलगीच आपले-कडे सांपडणें अशक्य. सावित्री ही द्युमत्सेन राजाची एकुलती एक मुलगी तिला अनुरूप वर मिळेना म्हणून वर पाहणेस बापाने तिलाच पाठविलें व तिनें सत्यवानाला वरले. पुढे ही कथा ती बापाला सांगत असतां सत्यवानाचे एकच वर्ष आयुष्य असल्याचें नारदांनीं सांगितलें. पण मनानें केलें तरीं ते केलेच ' मनःकृतंकृतं राम न शरीर कृतंकृतं ' असा तिचा निर्धार असल्यानें तिनें शेवटीं सत्यवानालाच वरिलें. लग्न झाल्यावर सर्व राजोपभोग टाकून ती सत्यवाना बरोबर तपोवनांत आनंदानें होती. आ-पली सासु, सासरा, नवरा यांची सेवा ती अत्यंत मनोभावानें करीत असून ती तपाचरण करून पुण्य जोडीत होती नवऱ्याचें मृत्युपूर्वी तिने तीन दिवस त्रिरात्र व्रत केले व शेवटच्या दिवशीं ती नवऱ्या बरोबर रानांत गेली. शेवटीं मृत्युचे वेळीं सत्यवानाचे डोके दुखुं लागले तसें तिनें त्यास मांडीवर डोके ठेवून निजणेस सांगितलें. यमधर्म सत्यवानाचे प्राण घेऊन जाऊ लागला तेव्हां त्याचे बरोबर ती गेली व शेवटीं आपल्या गोड भाषणानें त्याला संतुष्ट करून नवऱ्याचें प्राण तिने परत आणले व इतकें करून ही गोष्ट तिने कोणाला सांगितली सुद्धां नाहीं. ऋषीनी जेव्हां सावित्री तूंच आतां झालेली गोष्ट सांगून आमचे संशय घालीव म्हटल्यावर तिने झालेली

हकीगत सांगितली. सावित्रीचे सगळेच चरित्र अनुकरणीय आहे. तिचे सासु सासऱ्याचे आज्ञेत वागणे, मर्यादेनें नवऱ्याशी वागणे, यमधर्म प्रसन्न झाला असतां दोन्हीं कुळे म्हणजे माहेर व सासर यांचे हित होईल असें वागणे व शेवटपर्यंत स्वतः मागे रहाणे हें गुण अत्यंत उदाहरणीय आहेत. यासाठीं त्रिरात्र उत्सव करून ज्या वडाखालीं हा सावित्रीचा शेवटचा प्रसंग घडला त्याच खालीं तिची पूजा करणे फार योग्य आहे.

४ **शिवामूठ**—गौरीहर यांचा जोडा हें आपल्या हिंदु स्त्रियांचे ध्येय असल्यानें त्यांच्या पुष्कळ उत्सवांत याच देवतांची पूजा असेत. शिवामूठ यांत शंकराची पूजा आहे. दर श्रावणे सोमवारी नूतन विवाहित स्त्रियांनीं ही पूजा करावयाचा असते त्यानीं सबंद तांदूळ शिवाला मूठभर वहावयाचे असतात. शिवामूठ वाहिल्यानें शंकर प्रसन्न होऊन अपार संपत्ति देतात. याच सोमवारी प्रौढ स्त्रिया धसकी फसकी वाहतात. उलथा पसा व पालथा पसाभर तांदूळ शिवाला वाहणें व भांडे नंदीवर झाडणें या व्रताला धसकी फसकी म्हणतात. हें व्रत पण संपत्तिदायक आहे. पूजा करणाऱ्या मुली या व्रताच्या गोष्टी एकमेकीस सांगतात याला कहाण्या म्हणतात. शंकर ज्या प्रमाणें आशुतोष थोडक्यांत संतुष्ट होणारे आहेत त्याच प्रमाणें पतिदेव पण थोडक्यांत संतुष्ट होणारा आहे व तो संतुष्ट झाला तर आपणांस सर्व सुखे मिळाल्या प्रमाणेच आहेत असें या उत्सवाचें तात्पर्य आहे.

५ **मंगलागौरी**—श्रावणांतील प्रत्येक मंगळवारी या गौरीची पूजा करावयाची असते, नवीन विवाहीत मुलींनीं विवाह झाल्यावर पांच वर्षे ही पूजा करावी असें आहे दिवसा पूजा करून रात्रीं मुली जागरण करतात. एकमेकींनी एकमेकींचा मत्सर करूं नये हें या सणाच्या कथेपासून शिकावयाचे आहे मत्सर करणारी व्यक्ति दुसऱ्याचे अहित करण्याचा प्रयत्न करतांना आपले अहित करून घेते हें या पासून शिकावयाचे आहे.

६ **वर्णसठी व शिळासप्तमी**—श्रावण शुद्ध षष्ठी व सप्तमीस या पूजा करावयाच्या असतात. यांत नवरा गरीब असो श्रीमंत असो, जीवंत असो मेलेला असो स्त्रियांनां जगांत तोच पूज्य होय हें तत्व या कथांत आहे. आईबाप सुद्धां आपले खरें स्नेही नव्हत पण नवराच आपला खरा व शाश्वतचा आधार होय असें या कथांत सांगितलें आहे.

७ **कृष्णाष्टमी**—श्रावण वद्य अष्टमीस हा उत्सव करतात याचें सविस्तर वर्णन पुरुषांचें सण पुस्तक दोन यांत दिलें आहे. या गोष्टी-पासून धडा काय घ्यावा हें येथें सांगणें आहे, श्रीकृष्ण चरित्रांत पांडवांचे चरित्र गुंतलेले आहे या दोन चरित्रांमिळून चार स्त्रियांची चरित्रे उदाह-रणीय आहेत. रुक्मीणी, द्रौपदी, तारामती, व दमयंती या त्या चार स्त्रिया होत.

**रुक्मिणी**—श्रीकृष्णाची पट्टराणी रुक्मिणी होय. श्रीकृष्णाला मुख्य आठ स्त्रिया असून, सोळा हजार एकशे इतर स्त्रिया होत्या. इतक्या सवती होत्या तरी रुक्मिणी कोणाशींही मत्सर न करतां सर्वांशीं प्रेमाने वागून उत्तम प्रकारें संसार करीत होती. श्रीकृ-ष्णाची सत्यभामा म्हणून दुसरी एक स्त्री होती. ती फार मत्सरी, अभिमानी व कांगावी बायको असे. श्रीकृष्णावर आपला पगडा असावा, आपण त्याच्या मोठ्या लाडक्या समजल्या जाव्या म्हणून सत्यभामेने नानाउपाय केले तरी रुक्मिणीपुढें तिचे तेज पडले नाहीं. शेवटीं नवरा वश होण्यास काय करावे असा प्रश्न सत्य-भामेने द्रौपदीस विचारला व तिनें नवऱ्याचें प्रमाणें भर्वस्त्री वागावें हाच तिला उपदेश केला.

**द्रौपदी**—ही द्रुपद राजाची मुलगी व पांडवांची बायको. हिचे नांव कृष्णा असे होते पण ही द्रौपदी या नांवानेंच प्रसिद्ध आहे. अनेक संकटे आली तरी ही नवऱ्याशीं सम सुखदुःखी होती.

पांडव वनवासास गेले तेव्हां त्यांच्या इतर बायका आपआपल्या माहेरी गेल्या पण द्रौपदीनें तसे केलें नाहीं. ती पांडवाबरोबर वनवासांतच नव्हे तर अज्ञातवासांत पण राहिली. नवऱ्याबरोबर तिने लोकांची नोकरी सुद्धां केली. द्रौपदीची संसारातील दक्षता नवऱ्यानां वरचेवर उत्तेजन देऊन त्यांजकडून योग्य कर्में करविणेची हातोटी, ब्राह्मण वगैरेची सेवा करणेची तत्परता, सवतीशी सुद्धां प्रेमानें वागणें, गरीबींत सुद्धां सासु वगैरेची प्रेमानें सेवा करणे वगैरे अनेक गुण कित्ता गिरविणे सारखे आहेत. तिची अनेक प्रकारे विटंबना झाली पण ती आपल्या थोर आचरणापासून तिळमात्र ढळली नाहीं. सर्व प्रकारची दुःखे तिने मोठ्या धैर्यानें सहन केली.

तारामती—ही अयोध्येचा राजा हरिश्चंद्र याची पत्नी. राजा हरिश्चंद्र हा अत्यंत सत्यनिष्ठ होता. तो इतका सत्यनिष्ठ होता कीं स्वप्नांत दिलेले वचन पण त्यानें खरें केले. स्वप्नांत त्यानें ब्राम्हणास सारे राज्य दान केले व वर दक्षणा देणेसाठीं आपणांस विकून घेतले. कोणत्याही दानाला वर दक्षणा स्टांपादाखल द्यावी लागते व सर्व राज्य दिल्यावर दक्षणा देणेस कांहींच उरले नाहीं म्हणून राजाला स्वतःला विकून घेणे भाग पडले. तारामती व रोहिदास यांनीं पण आपणांस हरिश्चंद्राबरोबर विकून घेतले. विकून घेतल्यावर मालकाची सेवा करतानां या दंपत्याला अनेक कष्ट पडले. अखेर रोहिदास सर्पदंशानें मेला व त्याला जाळणेची परवानगी घेणेसाठीं तारामती जवळ द्रव्य नव्हते. हरिश्चंद्र हा स्मशान-भूमीचे मालकाजवळ नोकर होता आपल्या स्वतःच्याच मुलाला आपली पत्नी जाळणेस आली असतां कर देणेस पैसा नाहीं म्हणून हरिश्चंद्र जाळूं देईना. इतकेंच नव्हे तर परवानगी वांचून चिता रचल्याबद्दल वगैरे मालकाचे आज्ञेने तो तिला शिक्षा

करणेस तयार झाला. इतकी दुःखांची परमावधी झाली तरी अखेर मरताना तारामतीनें जन्मोजन्मी हरिश्चंद्रा सारखा नवरा, रोहिदासा सारखा मुलगा व विश्वामित्रा सारखा याचक असावा व आपण अनेक कष्ट सोसून त्या याचकाला संतुष्ट करावे असे मागितले. कोण हा थोरपणा व काय ही पतिनिष्ठा व सत्यनिष्ठा, या तोडीचे उदाहरण सगळ्या जगाचे इतिहासांत दुसरें सांपडावयाचे नाहीं. मनुष्य जन्माला आला ह्मणजे अनेक कष्ट हे त्याचे मागे लागलेच आहेत पण त्या सर्व कष्टांनां बाजूला सारून जो आपले कर्तव्यकर्म चोख करील तोच थोर.

**दमयन्ती**—दमयन्ती ही विदर्भ देशच्या राजाची मुलगी व निषेध देशच्या नळ नांवाच्या राजाची बायको होती. नळ हा सर्व गुणांनीं अत्यंत पूर्ण होता व म्हणून इंद्र, यम, अग्नि व वरुण या चार देवानां सोडून दमयन्तीनें नळालाच वरले. पण ही गोष्ट कलीला आवडलीं नाहीं व यासाठीं दमयन्तीला शिक्षा करणेचा त्यानें निश्चय केला. अनेक वर्षे वाट पहात टपून बसल्यावर नळाचे हातून एक चुकी झाली व कली त्याचे अंगांत शिरला. कली अंगांत शिरल्यावर नळाला द्युत खेळण्याची बुद्धि झाली व त्यांत तो आपले राज्य हरला. नळ द्युताचे नादी लागला असून हरत आहे असें कळतांच दमयन्तीनें आपली मुलें आपले माहेरी पाठविली व नवऱ्याबरोबर कष्ट सोसण्यास ती तयार झाली. अखेर नळाचे राज्य गेल्यावर ती दोघे रानोमाळ भटकुं लागली व तिला माहेरी जाण्याबद्दल नळानें पुष्कळदां सांगितलें पण ती ऐकेना म्हणून नळ तिला सोडून निघून गेला व ऋतुपर्ण राजाजवळ नोकरीस राहिला. दमययन्ती जागी होऊन पहाते तो नळ नाहीं. मग तिनें त्याचा शोध केला पण तो सांपडेना तेव्हां ती पण शेजारचे राज्यांत राजाकडे नोकरीस राहिली. नळ

दमयन्ती रानोमाळ फिरत आहेत असें समजतांच त्यांचा शोध करणेसाठीं दमयन्तीचें बापानें लोक पाठविले व त्यापैकी एकानें दमयन्तीस ओळखून तिच्या बापाकडे नेलें. मग नळाचा शोध लावणेसाठीं उद्यां दमयन्तीचे स्वयंवर आहे असें सर्व राजांस कळविलें व एक दिवसांत विदर्भ देशास जाणें अशक्य म्हणून ते गप्प बसले. ऋतुपर्णाजवळ नळ होता व त्याला अश्वविद्या येत होती म्हणून हे दोघे एक दिवसांत विदर्भपुराला आले तेव्हां यांत नळ असावा असा दमयन्तीनें तर्क केला व अनेक कसोट्या लावून ऋतुपर्णाचा सारथी नळच आहे अशी तिनें खात्री केली. शेवटीं नवरा बायकोची विदर्भ राजाचे अनुज्ञेनें गांठ पडल्यावर दमयन्तीनें तुम्ही मला कंटाळून गेला म्हणून विचारलें व नळानें तूं फिरून कां स्वयंवर करतेस म्हणून विचारलें व एकमेकांचे खुलाशानें एकमेकांचे समाधान झालें. याप्रमाणें दुसऱ्या खुलाशावर विश्वास ठेवणेनें भांडण मिटतें अशी कर्कोटकस्य नागस्य दमयंत्या नलस्यच । ऋतुपर्णस्य राजर्षे कीर्तनं कलिनाशनं ॥ १ ॥ या श्लोकांत ह्मण पडली.

**हरतालिका**—भाद्रपद शुद्ध तृतीयेस हें व्रत सर्व स्त्रियांनीं करावयाचे असते. 'हरहर' म्हणून टाळ्या पिटणें असा हरतालिका या शब्दाचा अर्थ आहे. दक्षाची मुलगी सती ही शंकरांनां दिली होती. दक्षानें आपले घरचे यज्ञांत शंकरानां स्थान दिलें नाहीं म्हणून रागावून सतीनें यज्ञकुंडांत देहत्याग केला. नंतर ती हिमालयाचे पोटीं पार्वती या नांवानें जन्मास आली. तिचे गुण व सौंदर्य पाहून भगवान् विष्णुनीं तिला मागणा घातली पण ही मागणी पार्वतीला पसंत नव्हती म्हणून बाप कदाचित् ही कबूल करील या भितीनें भाद्रपद शुद्ध द्वितीयेस पार्वती आपल्या एका मैत्रीणीबरोबर पळून गेली व रानांत तप करीत बसली. आपल्याला शंकरच नवरा मिळावा म्हणून ती तप करीत होती. पळून

जाण्याचे बेतानें पार्वतीनें या दिवशीं सर्व तयारी केली म्हणून या दिवसाला ' आवरणे ' तयारी करणेचा दिवस असे नांव आहे. वनांत गेल्यावर पार्वतीनें फार कठीण तप केले, कित्येक दिवस तर तिने झाडाचें पान सुद्धां खाल्ले नाहीं. नुसते लंघन घडूं नये म्हणून ती रुईचे नुसते पान शंकराची मध्यरात्रीची पूजा करून चाटी व हेंच कर्म हरतालिकेचे दिवशीं आपल्या बायका पण करतात. अशी तिची भयंकर तपश्चर्या पाहून भगवान् शंकर प्रसन्न झाले. पण त्यांनीं तिची परीक्षा पहाणेसाठीं शंकराचे दारिद्र्य, विचित्र पोषाक, वेडगळ आचरण, विलक्षण विरक्ति व वृद्धपण याचे यथार्थ वर्णन केले व अशा पुरुषास वरून सुखाची आशा व्यर्थ असें तिला दाखविलें. पण इतके दोष असले नव्हे यापेक्षांही जास्त दोष असले तरी मला शंकर नवरा पाहिजे. जें आपणाला दोष वाटतात तें दोष नसून गुण आहेत असें पार्वतीनें त्यांना सांगितलें व शेवटीं ती त्यांची निंदा ऐकून कंटाळली व रागावली सुद्धां तेव्हां शंकर प्रगट होऊन तिला वरण्याचे त्यांनी कबूल केलें व या प्रमाणें पार्वतीची इच्छा पूर्ण झाली. या तपावरून पार्वतीला ' अपर्णा ' पान सुद्धां न खाणारीं व ' उमा ' अग तप पुरे कर अशीं दोन नांवे पडली. ज्या दिवशीं पार्वतीला वरण्याचे शंकरांनी कबूल केले ती हा भाद्रपद शुद्ध तृतीया व या दिवशीं रुईचे पान चाटून तिने दिवस काढला होता. पार्वतीचे एकंदर चरित्रच मोठे उज्वल आहे पण त्यांत नवऱ्याचे दोषांकडे दोषरूपानें न पहाणें हा गुण मोठा घेणे सारखा आहे. या जगांत निर्दोष असें कांहींच नाहीं. भगवान् शंकर, भगवान् महाविष्णु यांच्यांत सुद्धां कांहीं दोष आहेत मग इतर मर्त्य मानवांची काय कथा ? शिवाय आपणाला अगदीं निर्दोष पति किंवा पत्नी असावी असे म्हणण्या इतके आपण तरी कोठे निर्दोष आहोत. प्रत्येक पुरुषाला दमयन्ती सारखी सर्व गुणसंपन्न स्त्री पाहिजे असते पण आपण नळा सारखे योग्यतेचे असल्याशिवाय ती कशी मिळेल असा विचार कोणी करीत नाहीं. प्रत्येक स्त्रीला आपणाला नळ, रामचंद्र युधिष्ठीरा

सारखा पति असावा असें वाटतें पण आपण स्वतः दमयन्ती, सीता, द्रौपदी प्रमाणें उत्तम गुणयुक्त असल्याशिवाय हें भाग्य आपणास कसें मिळेल. आपण स्वत: रत्न व्हावे तेव्हां कोठें सोन्याशी गांठ पडावयाची हें लक्षांत ठेवून आपल्या योग्यते प्रमाणे आपणांस जें मिळाले त्यांतच संतुष्ट असावे. हा धडा या व्रतापासून शिकावयाचा आहे आपण फार मोठी हांव धरली तर उंदीर व सिंह यांचें लग्न प्रमाणें त्या पासून आपला नाश मात्र व्हावयाचा व सुख कांहींच लागावयाचे नाहीं हें जाणून संतोष ठेवावा. प्रत्येकांत जसा कांहींतरी दोष असतोच त्याच प्रमाणें प्रत्येकांत कांहीं तरीं गुण पण असतोच. अगदीं मुळींच गुण नाहीं असा पदार्थच सृष्टींत नाहीं सबब आपले पदरी पडलेले वस्तूचे गुणाकडे पाहून समाधान ठेवावे. आपण गुणाकडे नजर ठेवली ह्मणजे गुणांचा उत्कर्ष होतो व त्या पासून दोहींपक्षी अत्यंत कल्याण व फायदा होतो हें या पासून शिकावे.

**ऋषीपंचमी**—ही भाद्रपद शुद्ध पंचमीस येते. हिला आलिकडील भाषेंत ‘ स्वावलंबन पंचमी ’ म्हणावे लागेल. प्रत्येक स्त्री ही दर महिन्यास विटाळशी होते व त्यावेळीं ती अस्पृश्य असते, पण विटाळशी होत असतां ती इकडे तिकडे शिवून कळत न कळत तिच्या हातून विटाळ पसरविला जातो या दोषाचे निरसन व्हावे म्हणून हा उत्सव आहे, श्रावणीमधें जसे वेदाध्ययन करतानां अजाणपणे जे दोष होतात त्यासाठीं ऋषीची पूजा व माफी मागणे आहे त्याच प्रमाणे न कळत जो दोष आपले हातून होणेचा संभव आहे त्याबद्दल माफी मागून ऋषीची पूजा करणेचा हा समारंभ आहे श्रावणीत जसें पंचगव्य सेवन शारिरीक दोष परिहारासाठीं आहे त्याप्रमाणें आघाड्याचं सेवन ऋषी पंचमीत आहे. आघाडा हा जननेंद्रिय शुद्धि करणारा आहे. आघाडा जाळून त्याची राख पाण्यांत घालून प्याल्यास जननेंद्रिय संबंधी अनेक दोष दुरुस्त होतात. यासाठीं ऋषी पंचमीचे दिवशीं दांत घासणेस आघाडा, आंघोळीस आ-

घाडा, चूळ भरणेस आघाडा, या प्रमाणें आघाड्याचा उपयोग केला आहे. या दिवशीं स्वतः लावलेली भाजीच खावी व या योगे भाजी लावणे, वगैरे काम आपल्या हातून अवश्य घडावें असा शास्त्रकारांचा हेतू आहे. या साठीं माणसांचे केवळ माणसांचे श्रमाने पैदा झालेले अन्न मात्र ऋषीस द्यावे असा निबंध आहे. हे अन्न अतिशय साधे व तसेंच फार रुचकर असते. या रुचकर अन्नाची रुची लागून तसे अन्न नेहमी खाण्याकडे माणसांची प्रवृत्ति व्हावी असा पण हेतू या व्रतांत आहे. विटाळशीचा विटाळ कळून न कळून आपल्या हातून कालविला गेला असेल त्याबद्दल शिक्षा म्हणून हें व्रत आहे व यांत स्वावलंबन शिकविण्याचा मोठा हेतु आहे.

**गौरी**—भाद्रपद शुद्ध सप्तमीस गौरी येतात अष्टमीस त्या जेवतात व नवमीस त्या परत जातात. या गौरी दोन बहीणी आहेत. त्यांची नांवे ज्येष्ठा व कनिष्ठा गौरी या होत. दक्षाची मुलगी सती ही ज्येष्ठा अगर वडील गौर असून हिमालयाची मुलगी पार्वती ही कनिष्ठा अगर धाकटी गौर होय असे पण कित्येक सांगतात. या गौरीची पूजा करून त्यापाशीं अखंड व अचल संपत्ती मागणे हा या व्रताचा हेतु आहे. कोंकणस्थ मंडळींत या गौरी खड्यांच्या असतात व देशस्थांत या मुखवट्यांच्या असतात. धारवाडकडिल कानडी लोकांत गौरीच्या दिवशीं भिंतीवर हादग्याचे झाड काढून त्याची पूजा अर्चा करतात. पुरुषांचा गणपतीचा उत्सव चालू असतानां बायकांना पण त्याच प्रमाणे ज्ञानसत्र करणेसाठीं ही गौरीचे उत्सवाची योजना आहे. यावेळीं बायका अनेक गाणी म्हणून एकमेकींना ज्ञान संपादनांत मदत करतात. पूर्वी पुरुषांनां द्यावयाचे ज्ञान श्लोकांत घालून ते त्याज कडून पाठ करवून देत व बायकांना द्यावयाचे ज्ञान गाण्यांत घालून, ती पाठ करून घेऊन त्यांत देत. अशा प्रकारची अनेक गाणी पूर्वीच्या बायका म्हणत. बहुतेक गाण्यांत श्रीकृष्ण अगर त्याचे वेळचे मंडळीस ती गोष्ट घडल्याचे वर्णन आहे. उदाहरणार्थ

घरांत मुलांना देवी आल्या म्हणजे देवीचे गाणे म्हणतात त्यांत देवी कशा येतात. त्यांचे प्रकार किती, देवी आल्यावर काय उपचार करावे व वर्तन कसें ठेवावें वगैरे माहिती मोठी उत्तम दिलेली आहे व देवी आल्यावेळीं हे गाणें रोज म्हटलें म्हणजे या गोष्टी प्रमाणें आचरण करणे सोईचे होते. न्हाणवली, गर्भाधान, डोहाळतुली, बाळंतीण, दृष्ट, मोडशी, देवी, गोंवर, कांजिण्या, खोकला, वगैरे सर्व गाणी याच प्रकारची आहेत व उत्सवांत ती म्हणायला शिकण्याची योजना आहे.

महालक्ष्मी—ज्या प्रमाणें चैत्रांत महिनाभर गौरीचे पुढें प्रदर्शनें भरतात त्याच प्रमाणें आश्विन महिन्यांत देवीपुढें नऊ दिवस नवरात्र असते व मार्गशीर्षांत पण चंपाषष्ठीचे नवरात्र असते. पहिले म्हणजे आश्विनांतील नवरात्रांत देवींची आराधना असते व दुसऱ्या मार्गशीर्षांतील नवरात्रांत खंडोबाची आराधना असते. आश्विनांतील नवरात्रांत अष्टमीचे दिवशीं स्त्रिया महालक्ष्मीची पूजा करतात. या महालक्ष्मीचे पूजेंत मुख्य घ्यावयाची गोष्ट म्हणजे मत्सर करूं नये ही होय. मत्सर करणारी व्यक्ति दुसऱ्याचे नुकसानें चिंतीत असते पण अखेर त्यांत तिचेच नुकसान होते, महालक्ष्मीचे रात्री बायका घागरी फुंकतात व या प्रमाणें घागरी फुंकतानां कित्येकानां देवी अंगांत येते, देवी अंगांत येणे म्हणजे एक प्रकारचा वात किंवा मेंदूची विकृत अवस्थाच आहे, या विकृत अवस्थेंत नेहमींपेक्षां निराळया तऱ्हेनें मेंदु काम करीत असतो व त्यामुळें साधारण ज्ञानाच्या पलिकडच्या गोष्टीही त्याला समजतात, बायका अशा विकृत स्त्रीला अनेक भविष्य काळाबद्दलचे प्रश्न विचारतात व ती त्यांची उत्तरें देते, कित्येक वेळा हें अंगांत येणे ढोंग अगर खोटे पण असते व या खोट्या स्त्रिया या स्वार्थासाठीं अनेक खोट्या गोष्टी सांगतात व त्यामुळें विचारणाऱ्या बायका भिऊन जाऊन त्या अंगांत येणारे स्त्रीच्या स्वार्थाला बळी पडतात. खरें म्हटलें तर भावी टाळण्याच्या शक्ती वांचून भावी ज्ञान व्यर्थ होय व यासाठीं ज्यांचे मन मजबत नसेल त्या माणसानें भविष्य जाण-

णेचा प्रयत्न करूं नये. भविष्य समजल्यानें बळकट मनाचे माणसांचा फायदा होतो पण खंबीर माणसे थोडी. भविष्य समजल्या पासून नुकसान होईल अशा मनःस्थितीचीच माणसे फार व यासाठीं केव्हांही भविष्य जाणण्याची इच्छा धरूं नये. या बाबतींत आपली जिज्ञासा नेहमीं दाबून धरावी व सर्व भार परमेश्वरावर ठेवावा. परमेश्वर भक्तांचा कनवाळू आहे हें जाणून त्याची अनन्यभावानें भक्ति करावी व स्वस्थ असावें.

**वसुबारस**—आपल्या देशांत पूर्वीपासून दुधदुभत्याचे काम मुली कडे आहे. दुहितृ हा शब्द दुध काढणारी या अर्थाचा आहे व या वरून दूध काढणेंचे काम मुलीकडे व गुरें राखणेचें काम मुलांकडे पूर्वीपासून आहे या कर्माला अनुसरून गुरांची पूजा करणेसाठीं बायकांची वसुबारस व पुरुषांसाठीं धनत्रयोदशी असे दोन दिवस दिवाळींत राखून ठेवले आहे. धन ह्मणजे गुरेढारे व त्यांची तिथी ती धनत्रयोदशी वसुबारशेचे दिवशीं गाई व वासरे यांची पूजा करून गोवारीची भाजी व बाजरीची भाकरी खाणेची रीत आहे. बाजरीचे पिक नुकतेच निघालें असलेमुळें या दिवशीं बाजरीचीच भाकरी खाणेस सांगितलें आहे. आपले शास्त्रकारांचा आपलें शेतांतल्या त्या काळीं जे पीक आले असेल ते खाऊन सण साजरा करणे-कडे कटाक्ष आहे. तांदूळ पिकले पोहे व दुध खा, तीळ झाले हलवा खा, गहू व गुळ झाला पुरणाची पोळी करा, पालेभाजी आली पालाच खा, असे निरानिराळे सणांचे प्रयोग त्यांनीं सांगितले आहेत. दिवाळी ह्मणजे सर्वांनां ज्याचे त्याचे योग्यते प्रमाणें सुख देणेचे दिवस. यांचा प्रारंभ बायकांचे वसुबारसेपासून होऊन शेवट बहिणतिजेत होतो. आश्विन वद्य द्वादशी ही वसुबारस.

**बहीणतीज**—कार्तीक शुद्ध तृतीया ही बहीणतीज. भाऊबीजेचे दिवशी भावानें बहिणेकडे जावयाचे व बहिणातिजेचे दिवशीं बहिणीनें भावाकडे जावयाचे. द्वितीयेस बहिणीनें भावाचा सत्कार करावयाचा व तृतीयेचे दिवशीं भावानें बहिणीचा सत्कार करावयाचा असतो.

**तुलसीविवाह**—चातुर्मास्य लागण्याचे वेळीं ह्मणजे आषाढ शुद्ध एकादशी अगर दशमीस तुळस लावावयाची. मग चार महिने तिचे उत्तम तऱ्हेनें पालन पोषण करावयाचे व मग ती भगवंताला लग्न लावून द्याव-याची याला तुलसीविवाह ह्मणतात. तुलसीचा असा विवाह करणेंत तिचे अनन्यत्व व भगवंताला तिचा त्याग करतां येत नाहीं अशा दोन गोष्टी विशेष दाखविल्या आहेत. तुलसीविवाह हा गोकुळवृंदावनातील श्रीकृष्णाचे खेळण्यास अनुलक्षून आहे दिवाळी झाल्यावर शरद ऋतूतील स्वच्छ चांदण्यांत रात्री गोकुळातील गोपगोपी व श्रीकृष्ण भगवान अनेक खेळ खेळले या गोष्टीला अनुलक्षून राधा दामोदराबरोबर तुळसीचा विवाह होतो. तुळस ही वृंदेचा दुसरा जन्म व वृंदावन हें तुळसीचे वनच होते व या वनांत खेळ खेळतानां तुळसीचे हार, मुगुट वगैरे अनेक प्रकार करून तिचा श्रीकृष्णानीं गोपांबरोबर उपभोग घेतला व म्हणून श्रीकृष्णा बेराबर तुळसीचा विवाह करतात, पाऊस पडून जिकडे तिकडे आबादानी झालेली नद्यांचें पाणी सुंदर स्वच्छ झालेले, आकाश अगदीं निरभ्र, चांदणे उत्तम स्वच्छ पडलेले तुळसी मंजरीचा घमघमाट सुटलेला अशा वेळीं श्रीकृष्ण गोप व गोपी यांज बरोबर अनेक खेळ खेळले याचे हे तुळसी विवाह हें स्मारक आहे.

**भोगी**—मकरसंक्रांतीचा महिनाभर म्हणजे धनसंक्रांत झाल्या-पासून मकरसंक्रांत लागेपर्यंत थंडी फार असते व दूधदुभेत पुष्कळ असून तीळ नुकतेच पिकलेले असतात तेव्हां तीळ, तूप, लोणी वगैरे जिन्नस पुष्कळ खावे. मुगाची खिचडी तीवर खोबरे व तूप, तीळ लावलेली भाकरी व तिजबरोब लोणी असे या महिन्यांत खावे ह्मणजे अंगांत उब राहून थंडी बाधत नाहीं. गुजराथेंत तर या दिवसांत उडदांचे लाडू सकाळीं खाण्याचा प्रघात आहे. तिळ व गुळ यांचे लाडू खाणे पण या दिवसांत चांगले. तात्पर्य पौष्टीक पदार्थ खाणेचा हा महिना म्हणून बो

प्रसिद्ध आहे. भोगी हा या महिन्याचा शेवटचा दिवस म्हणून बायकांनी त्या दिवशीं न्हावे व चांगले पदार्थ खावे असा रिवाज पाडला आहे.

**मकरसंक्रांत**——या नंतर मकरसंक्रांतीच्या दिवशीं ब्राम्हणाना तिळ गुळांचे लाडु निदान नुसते तीळ दान करावे ह्मणून शास्त्र सांगते. गृहस्थाचें घरीं तिळाचे पीक आले, त्यांनी त्यांचा महिनाभर तथेच्छ उपभोग घेतला तेव्हां ज्याना हा लाभ मिळाला नाहीं अशा गरीब माणसानां हा लाभ देण्याची संधी फार योग्य होय. ब्राह्मण गरीब व त्यात अयाचित व निःस्पृह तऱ्हेनें वागणारे यासाठीं त्यांना हे लाडु देऊन त्यांची पूजा करावी असें शास्त्र सांगते. हें लाडू फक्त ब्राह्मणानाच द्यावे असे नाहीं सर्वांनां द्यावे व त्यातले त्यांत ज्याना हें मिळाले नसतील त्याना विशेषेकरून द्यावे. जी माणसे संपन्न असतील त्यांनी आपले संपत्तीला अनुरूप अशी कोणतीही जिन्नस गोरगरीबाकडून लुटवावी. या रिवाजांत सुद्धां आपल्या गरीब देशबांधवानां जी वस्तु मिळत नसेल ती त्यांनां देणेची योग्य तजवीज केली आहे. अलिकडे या चालीचा योग्य उपयोग मात्र होत नाहीं. लुटविलेली जिन्नस ज्याना ऐपत नसेल अशा माणसांनीच घ्यावी इतरांनी तिला नुसते वंदन करावे असें शास्त्र सांगते व हल्ली धनिकांच्या बायका सुद्धां उंस किंवा शेंगांची लूट घेऊन जातांना दिसतात. हें त्यांचे करणे गैर आहे. ज्यानां त्या जिनसा मिळत नाहींत, घेण्याची ऐपत नाहीं अशा स्त्रियांनी या लुटीचा लाभ घ्यावा. समाजांत स्पर्धा व द्वेष वाढूं नये म्हणून सर्वांनां थोडा फार तरी सर्व पदार्थांचा उपभोग मिळवून देणेसाठीं शास्त्रकारांची ही योजना आहे, या प्रमाणें संपन्न लोकांनीं गरीबाना स्वखुषीनें वस्तु दिल्या म्हणजे गरीबांचे मनांत श्रीमंताबद्दल द्वेष उत्पन्न न होता कृतज्ञताबुद्धी वाढते व गरीबांचे आशिर्वादाने श्रीमंतपण अधिक संपन्न होतात,

उत्सव—एकादशी, शिवरात्र वगैरे उत्सवांत बायका पुरुष या दोघानांही सारखाच भाग घेतां येतो तसेच कथा, पुराण, भजन वगैरेंत पण त्याना तसेच सामील होता येते. पुरुष वेद म्हणतात त्या ऐवजी बायकांनां गाणी म्हणणेची सोय आहे. केवळ बायकासाठींच हरतालिका ऋषीपंचमी वगैरे सण असून त्या दिवशीं त्यांनी एकमेकींनां ज्ञान देणेची योजना आहे. या प्रमाणें आपल्या शास्त्रकारांनीं स्त्रिया व पुरुष यांनां समानत्वानें वागविले आहे. त्यांची योजना अनेक वर्षांच्या विविध अनुभवांनी फार उत्तम प्रकारें बनविली आहे. कोठेंही, कांहींही चांगले सांपडलें कीं ते उचलावे हा आपले शास्त्रकारांचा बाणाच आहे. आपला हिंदुधर्म फार संग्राहक व उदार आहे. मुसलमान लोक डोले करतात तर हिंदू पण डोले करूं लागले इतकेच नव्हे तर मराठी राज्यांत डोल्यानां नेमणुका सुद्धां मिळाल्या. पुण्यांतील नानाफडणवीस यांचा घोडेपीर हे याचे चांगले उदाहरण आहे. फार काय पण ख्रिस्ती लोक आपले लोकांत मिसळतील त्यांचे सुद्धां कांहीं घेणेयोग्य सण असल्यास हिंदुलोक उचलतील. आपली पूर्वपरंपरा मात्र हिंदु सोडीत नाहींत हा त्यांचा मोठा गुण आहे व या वरून त्यांचा अनेक शतकांचा सुसंगत इतिहास त्यांच्या चाली रितींत सापडतो. ही आपली परंपरा कायम ठेवणेची रीत हिंदू लोकांत नसती तर त्यांचे हिंदुत्वच लोपण्याचा प्रसंग आला असता. काळ नेहमी बदलत असतो व त्या प्रमाणें लोकांच्या वागणुकींत पोशाकांत खाण्यांत, पिण्यांत व्यवहारांत फेर पडतो तरी पूर्व परंपरेला धरून फरफार करणेचा प्रघात असल्यामुळें मागील सर्व गोष्टींची आठवण कायम रहाते. उपनयन संस्कार श्रावणीसारखे सण या वरून आपल्याला कितीतरी बोध घेतां येतो. तसेंच आपलें आठ प्रकारचें विवाह यामुळें आपणांस किती शिकण्या व शिकविण्यासारखे आहे पण आपण आपले बुद्धीस फांटा दिल्यामुळें इंग्राजनां ब्राम्ह विवाह शिकवावा, त्याना मूर्तिपूजा करणेस लावावे, विजार सोडून धोतर नेसण्यास सांगावे त्या ऐवजी आपणच उलट-

गतीने जाऊन त्यांचा गांधर्व व प्रौढ विवाह घेऊं पाहतो, डोळे मिटून प्रार्थना करूं लागतो व विजार घालून केंस राखतो याला काय ह्मणावें आम्ही पुरुष असें करतो इतकेंच नव्हे तर बायकाना करायला लावतो. डोळे उघडून पाहून या बाबतींत योग्य तो धडा आम्ही कधीं घेणार कोण जाणे. मोठे विचारी म्हणून ह्मणवावयाचे व सारासार विचार न करतां आंधळ्या प्रमाणें नुसते अनुकरण करावयाचे यास काय म्हणावे. कोठेंही चांगली जिन्नस मिळेल ती अवश्य घ्यावी पण चांगली जिन्नस टाकून वाईट चाल उचलावी याला हंसावे कां रडावे. चांगला ताजा भात व ताजी भाकरी व भाजी खायची सोडून शिळे, वाळलेले, लांकडासारखे तुकडे उन्ह पाण्यांत भिजवून मऊ करून खाणेंत भूषण मानणारांचे कोणत्या शब्दांनी पूजन करावे कळत नाहीं. असो येथपर्यंत स्त्रियांचे उत्सवाचे वर्णन झालें आतां त्यांचे संस्काराकडे वळूं.

# प्रकरण तिसरें.

---

## संस्कार

स्त्री व पुरुष यांचे भेदाचा प्रारंभ जन्मापासून वयाचे आठवे वर्षी होतो म्हणून गर्भाधान ( आईचे ) पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, कर्णवेध, सूर्यदर्शन व अन्नप्राशन हें संस्कार मुलांचे व मुलीचे सारखेच करावयाचे असतात. या संस्कारासाठीं धर्मशिक्षणाचा ओनामा पुस्तक तीनमधील विवेचन वाचावे

या नंतर मुलाचा चौल हा विवाह असतो तो मुलींना नाहीं व नंतरचा उपनयन संस्कार मुलांचा होतो त्याचे ऐवजी मुलीचा विवाह संस्कार करणेस शास्त्रकार सांगतात. मुलांचे शरीरांत धातू उत्पन्न होणेस सोळावे वर्षी प्रारंभ होतो व मुलीचे शरीरांत रज व गर्भाशय उत्पन्न होणेस आठवे वर्षी प्रारंभ होतो. म्हणून पातिव्रत्याकडे दृष्टी देऊन गर्भा-

शय उत्पन्न होऊं लागण्याचें वेळींच मुलीचे लग्न करावें असें शास्त्र सांगते. लग्नाचा काळ शास्त्रकार असा सांगतात.

यावन्नलज्जते कन्या यावत्क्रीडति पांसुना ।

आपले गुह्यांग झांकावें, मातीत खेळूं नये असें मुलीला वाटूं लागलें कीं तिचा विवाह करावा. नागवे रहाणेची लाज वाटणें म्हणजे गर्भाशयाचे उत्पत्तीला शरीरांत प्रारंभ होणे होय व तेव्हांपासून या गर्भाशयावर अमक्याची मालकी अशी भावना पातिव्रत्याच्या दृष्टीनें इष्ट आहे. मनाने केलेले कर्म पण घडलेच असें समजणेची शास्त्रकारांची प्रवृत्ति असल्यामुळें तेही खबरदारी घेतात. जेव्हां सहा ते आठ वर्षांचें मुलगे आईबापांचें घर सोडून गुरुगृहीं विद्यार्जनासाठीं जात त्या वेळीं सहा ते आठ वर्षांच्या मुलींनी पण सासरी जाणे व तेथें त्यांच्या वागणुकीला योग्य असें शिक्षण घेऊन सासरच्या कुटुंबाशी एक जीव होऊन जाणे चमत्कारिक वाटत नसे. पण आतां मुलगे गुरुगृही न जातां घरीं राहूनच शिक्षण संपादन करतात म्हणून मुलींनी पण घरी म्हणजे माहेरी राहूनच शिक्षण संपादन करावें असें आपणांस वाटते. मुलगे गुरुगृही न गेल्यामुळें त्यांच्या अंगी ओज, तेज, तप वगैरे गुणांचा योग्य परिपोष होत नाहीं त्याच प्रमाणें मुली पण लग्नावांचून माहेरी मोठ्या झाल्या म्हणजे त्यांचे अंगी विनय चाणाक्षपणा व तप हे गुण उत्पन्न होत नाहींत. आईबापांनीं मुलांनां मोळा लावण्याचा कितीही आटोकाट प्रयत्न केला तरी आईबापांचे प्रेम व मुलांचा लडिवाळपणा यामुळें तो लागत नाहीं व यासाठींच लहानपणापासून त्यांनां दुसऱ्याचें ताब्यांत देणेस शास्त्र सांगते. लहानपणी मुलें दुसऱ्याचे घरीं गेल्यापासून त्यांच्या अंगी स्वावलंबन, चाणाक्षपणा व शिस्त हें गुण येतात. आपण परक्या घरीं आहोंत, आपली आपण काळजी घेतली पाहिजे ही जाणीव त्यांनां मन दाबांत ठेवणेस व स्वतःच्या हिंमतीवर आधार ठेवणेस शिकविते. दहा घरची दहा मुलें असली म्हणजे परस्पर सहकार्याची पण त्यांनां संवय लागते. लहान भावंडाशी लहानपणी

वागतानां मुलांचे मनांत दया, प्रेम या गुणांचा प्रादुर्भाव होतो. आपल्या धाकट्या 'बाळा' साठीं आपण स्वार्थत्याग करावा हें शिक्षण घरीं भावंडांत मिळते तसे आपल्या मित्रांशी, स्नेहाशी आपण न्यायानें वागलें पाहिजे व ते पण आपल्याशीं तसेच वागणार हे शिक्षण गुरुगृही दहा मुलांत वागतानां मिळते. आईबाप संसारी असल्यानें त्यांचे हातून अनेक लहान मोठ्या चुका होण्याचा संभव असतो पण तपोवनांत विरक्तपणे राहणारे गुरुचे ठिकाणीं असा संभव नसतो व यामुळें शास्त्राचें शिस्तीनें वागणेची त्यांच्या हाताखालीं मुलांनां संवय लागते. इंग्रजी राज्यापासून आपण या अलभ्य लाभाला मुकलो ही आपली फार मोठी हानी झाली आहे व तपोवन संस्था निर्माण करून त्या ठिकाणीं वृद्ध माणसांचे देख-रेखी खालीं शिक्षण देणेची व्यवस्था होईल तो सुदीन. राष्ट्रीय शाळांची योजना या धर्तीवर झाली तरच ती फलद्रुप होईल. शाळेंत शिकून रोज आपल्या घरीं येणेची पद्धत फार वाईट आहे व या पद्धतीनें मुलांचें पूर्ण शिक्षण केव्हांही होणार नाहीं. रात्रंदिवस गुरुच्या सांनिध्यांत राहून सर्व प्रकारचा विद्याव्यासंग करणे या शिवाय उत्तम माणसे निर्माण होण्याला दुसरा मार्ग नाहीं. असो मुलींची लहानपणी लग्ने होऊन त्यांनीं सासरी जाऊन सासरच्या मंडळीना योग्य वाटेल तें शिक्षण त्यांचे सल्यानें घेणें व त्यांच्या मनाप्रमाणें वागणे यानेच उत्तम गृहीणी होतील नुसत्या पुस्तकी ज्ञानानें केव्हांही इष्ट फल मिळणार नाहीं.

या प्रमाणें मुलीचा विवाह म्हणजेच त्याचे उपनयन असें ठरल्या वर मुलीचा ब्रह्मचाऱ्याचा पोषाक व कर्तव्य कोणते याबद्दल विचार करणे प्राप्त होते. मुलांचा ब्रह्मचाऱ्याचा पोषाक म्हणजे करगोटा व लंगोटी, जानवे व दंड ही होत. त्याच प्रमाणें पोटाला आव्हा घालणेसाठीं परकर, गुह्यांग झांकणेसाठीं चोळी, स्वार्थत्यागाची दिक्षा म्हणून मंगलसूत्र व योग्य वर्तनाबद्दल हमी म्हणून बांगड्या मुलीनी धारण करावयाच्या असतात पुरुष शरीराचे महत्वाचे अंग म्हणजे लिंग त्याप्रमाणें स्त्री शरीराचे मह-

त्याचे अंग ह्मणजे स्तन. स्त्रियांचे गर्भाशय किंवा योनी या वांचून गर्भ धारणा व गर्भाची वाढ होऊं शकते हे अनेक ऋषींनीं सिद्ध केलें आहे. हरिणीचे पोटी ऋष्यशृंग झालें, गाईचे पोटी गोकर्ण झाले या गोष्टींपेक्षां अद्‌भूत ह्मणजे मडक्यांत अगस्त्य झाले ही होय. पण अगस्त्यांचे जन्मांत मित्र व वरूण अशा दोन व्यक्तींचे रेत होते. पण द्रोणांत झालेल्या द्रोणाचे वाढींत एकट्या भरद्वाज ऋषींचेच रेत होते. तात्पर्य रेताची योग्य रितीनें, जोपासना केली तर स्त्रियांचे मदती वांचून मुले निर्माण करतां येतात. यासाठीं स्त्रियाची योनी अगर गर्भाशय मुलांचे जन्माला अवश्य नाहींत व पिशवीपेक्षां यांची किंमत जास्त नाहीं, पण मुलें कशीही निर्माण हावोत त्यांचे पोषणास दूध अवश्य होय व हें दूध स्त्रियांवाचून उत्पन्न होत नाहीं व यासाठीं पुरुषाला जशी लंगोटी घालून इंद्रियनिग्रह शिकवावयाचा तसा इंद्रियनिग्रह स्त्रियांनां चोळी घालून शिकवावयाचा. शिवाय स्त्रियांनां परकोर हे वस्त्र असे आहे कीं ते गुह्यांग झाकून पोटाला पण आळा घालते. विधवा स्त्रियांनीं बांगड्या मंगलसूत्रा बरोबर चोळी टाकावयाची याचे कारण हेच. ज्या एका विविक्षित पुरुषाला आपल्याला बांधून घेऊन संसार करणेचे ठरविले होते ते बंधन सुटले याचे द्योतकच हा त्याग आहे. या प्रमाणें स्त्रियांचा ब्रह्मचर्य व्रत घेतल्याचा पोषाक आहे. पुढें पुरुषांचे जसे समावर्तन होते तसा पदर देणे हें स्त्रियाचे समावर्तनच होय. स्तन झांकण्यास नुसती चोळी पुरत नाहीं असें लक्षण दिसताच स्त्रिचे नवऱ्याने तिला पदर घेणेस शिकवावयाचे असते

ब्रह्मचर्य म्हणजे रतिसुखाचा त्याग असा अर्थ शास्त्रसंमत नाहीं ब्रह्मचर्य म्हणजे थोरपणाची वागणूक असा शास्त्रकारांचा अर्थ आहे, लहान मुलें घरीं असतात तेव्हा पोरकटपणानें वागतात. तसे वागण्याचे सोडून देणे याचे नांव ब्रह्मचर्यव्रत. या व्रतांत नियमित वर्तन हें अगदीं पहिले व महत्वाचे कर्तव्य होय. लहानपणीं स्वैर वर्तनाकडे प्रवृत्ति असते, आईबाप वडील वगैरेंच्या आज्ञा न मानण्याकडे कल असतो, काय

करावे व काय करूं नये हें समजत नसल्यामुळें अपाय कारक गोष्टी करण्याचा हट्ट असतो पण उपनयन किंवा विवाह झाल्यावर या गोष्टी सोडून शास्त्रांनीं घालून दिलेले नियम सर्व बाबतींत पाळणेस शिकणे थोरांचा मान राखणेस शिकणे, वडीलांच्या आज्ञा निमूटपणे पाळणेस शिकणे शास्त्रमर्यादेप्रमाणे वर्तन ठेवणें याचे नांव ब्रम्हचर्य. या ब्रह्मचर्यापासून गैर वर्तन केल्याने मनुष्य भ्रष्ट होतो एरवी तो भ्रष्ट होत नाहीं व म्हणूनच " अनृतौ तुयदागच्छेत् ब्रह्मचर्याद्विभ्रश्यते " " कामाद्विस्कंदयन रेतो हिनस्तिघ्रतमात्मन: " वगैरे वाक्यं आहेत. ब्रह्मचर्यात्कन्यायुवानं विन्दते पतिम् शुकांनां ब्रह्मचर्याने राहणेस जनक राजानें सांगितले, प्रजापतीनें इंद्र व विरोचन यांनां ब्रह्मचर्यानें राहणेस सांगितलें वगैरे वाक्यांत असल्या थोर आचरणाला ब्रह्मचर्य म्हटलें आहे. नुसता स्त्रीसग वर्ज केला अगर न केला म्हणजे ब्रह्मचर्य जाते अगर रहाते असा अर्थ नाहीं. मुलगी माहेरी असतानां तिला मोळा नमतो. ती हट्टाने, लडिवाळपणानें, वगैरे बेशिस्त वागते तो गैरशिस्तपणा लहानपणी सासरी जाऊन तिने सोडावयाचा असतो. सासरी तिनें कसें बसावे, कसें उठावे, काय बोलावें, काय करावें, काय करूं नये याबद्दल नियम असतात व त्या नियमा प्रमाणें तिनें वागायला शिकावयाचे असते. हें वागणेस शिकणे सोईचे व्हावे म्हणून विवाह झाल्यावर तिच्याबरोबर पाठराखीण म्हणून एक बाई पाठवितात, या स्त्रीनें त्या मुलीचें वर्तन चुकत असेल तर तिला शिकवावयाचे असते व अशा रितीनें एकदा रस्ता दाखवून दिला म्हणजे त्या रस्त्यानें मुलीनें वर्तन करावयाचे असते व हेंच तिचे ब्रह्मचर्य. या प्रमाणें माणसाने ब्रह्मचर्य हे जन्मभर पाळावयाचे असते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हलकटपणा, पोरकटपणा नव्हे ते ब्रम्हचर्य होय.

मुलानें जशी गुरुशुश्रुषा करावयाची तशी मुलीनें पति शुश्रुषा करावयाची, पति शौचास गेला कीं त्यासाठीं पाट मांडून त्यावर तोंड धुण्यास रांखोडी व पाय पुसण्यास रुमाल ठेवावा व जवळ दोन तपेल्या

पाणी भरून ठवावे, त्यास स्नानास पाणी द्यावे धोतर वणून द्यावे, संध्येस मांडावे. त्याची वस्त्रे धुवावी, जागा झाडून बैठक घालावी वगैरे आपल्या शक्ति प्रमाणें त्याची सेवा मुकाट्यानें, न बोलतां सांगणेपूर्वी चाणाक्षपणानें करावी, शिष्याने पण गुरुची अशीच सेवा करावयाची असते. शिष्यानें गुरुचीच सेवा करावयाची असते असे नव्हे तर गुरुच्या घरच्या सर्व माणसांची, गुरुचे गुरु, मित्र, पाहुणे वगैरेची पण करावयाची असते व त्याच प्रमाणें मुलींनीं नवऱ्याची व त्याच्या आप्तेष्ट, वडिल घरच्यामाणसांची करावयाची असते. गुरु शिष्याला ज्ञान देतो व त्यासाठीं गुरुपासून दंड, शिक्षा वगैरे पण शिष्यानें सोसावयाच्या असतात. गुरुच्या परवानगीवांचून शिष्याला घरीं अगर दुसरीकडे जातां येत नाहीं त्याच प्रमाणें मुलींनी पण सासरच्या माणसांच्या शिक्षा, बोलणी सोसली पाहिजेत व सासरच्या माणसांच्या परवानगी वांचून माहेरी जातां कामा नये. गुरु ज्या प्रमाणें आपले सर्व ज्ञान शिष्याला देऊन शेवटीं कृतार्थ करतात त्याच प्रमाणें नवरा पण आपली सर्व संपत्ति व पुण्यही बायकोस देऊन तिला कृतार्थ करतो एक गुरु केल्यावर ज्या प्रमाणें पूर्वी दुसरा गुरु करणे गैर समजत तसेच एक नवरा केल्यावर दुसरा नवरा करणे गैर. हल्लीं मात्र शंभर प्रकारचे शंभर गुरु एका दिवसांत शिष्याला होतात व ह्मणून त्याच प्रमाणें शंभर प्रकारचे शंभर नवरे करणेकडे बायकांचीं प्रवृत्ति होत आहे. आपले हल्लीचे वर्तन सर्वतोपरी विसंगतच आहे अशा वेळीं या गोष्टीचे आश्चर्य वाटणेचें कारण नाहीं. आपली हल्लींची स्थिती धड पूर्व ना पश्चिम अशी आहे. यःकश्चित संख्या मोजणेपासून तो थेट परमात्म्याला भेटण्यापर्यंत सर्व गोष्टीत आपली स्थिती भेडगुजरी झाली आहे. आपली जुनी परंपरा विचार परिलुत व सुसंबद्ध अशी होती व पाश्चात्यांची परंपरा पण त्यांचे प्रकारे विचारपूर्ण व सुसंबद्ध आहे पण आमची हल्लींची ' नहि इधर ना उधर ' अशी झाली आहे, आमची संख्या वाचन पद्धति लहान रकमेकडून मोठ्या रकमेकडे ह्मणजे एकं, मग

दहं, मग शतं, मग सहस्र अशी होती. इंग्रजांची संख्या वाचन पद्धति मोठ्या रकमेकडून लहान रकमेकडे अशी आहे ह्मणजे आधीं सहस्र, मग शतं, मग दहं व मग एकं अशी आहे. आम्ही एक्यायशी ब्यायशी म्हणतो त्याला ते आठ हजार दोनशे एंशी एक असे ह्मणतात ८२८१ व या दोन पद्धति दोन प्रकारच्या पण सुसंबद्ध आहेत पण आम्ही हल्लीं आठ हजार दोनशे एक्यायशी म्हणतो व हे ह्मणणे कोणच्याच रितीनें सुव्यवस्थित किंवा सोपपत्तिक नाहीं. जी गोष्ट संख्यांची तीच गोष्ट आमच्या यच्चयावत व्यवहाराची होय. मुलींच्या विवाहाची व वर्तनाची पण आमची तीच स्थिती, आमच्या ब्रह्मविवाहांत मुली अगदीं पराधीन असत. वडील माणसे करतील ते प्रमाण व म्हणतील तो नवरा. इंग्रजांत मुली अगदीं स्वतंत्र आहेत. मुलीला वाटेल तो नवरा वाटेल तेव्हां तिने करावा त्यात आईबापाचा कांहीं संबंध नाहीं. परमेश्वरीसूत्र किंवा मानवी परतंत्रपणा दोन्हीकडे सारखाच आहे. आईबापांचे मूर्खपणाने एखादे वेळीं वाईट नवरा मिळणेचा जसा संभव पहिल्या प्रकारांत आहे त्याच प्रमाणें आपल्या अज्ञानाने व जगाच्या स्वार्थीपणानें वाईट नवरा मिळणे दुसऱ्या प्रकारांत पण तितकेच संभवनीय आहे. पहिल्या प्रकारांत पण हटकून उत्तम नवराच मिळणे जसे अशक्य तसेच ते दुसऱ्या प्रकारांत पण आहे. पहिल्या प्रकारांत जसा आज मिळालेल्या नवऱ्यापेक्षां चांगला नवरा मागे पुढें मिळणेचा व आपण त्यावेळीं उगाच लग्न केले असे वाटणेचा संभव आहे त्याच प्रमाणे दुसऱ्या प्रकारात पण होणेचा संभव आहे. तात्पर्य दोन्ही पद्धतीपैकीं कोणतीही पद्धत घेतली तरी तींत सुख दुःख परमेश्वराधीन आपण शक्य तो प्रयत्न करावा हें तत्व सारखेच आहे पण या दोन्ही पद्धति आपआपल्यापरी सोपपत्तिक आहेत. पण आमच्या हलीच्या पद्धतीत सोपपत्तिकपणा मुळीच नाहीं, मुलगी अज्ञान असताना आपले समजुती प्रमाणें योग्य नवरा तिला करून देणे व याला मानीत जा म्हणून सांगणे हें एक प्रकारे ठीक आहे. तसेच मुलगी सज्ञान झाल्या-

वर केवळ तिच्या इच्छेने तिला पसंत तो नवरा तिने करावा हें दुसऱ्या प्रकारें ठीकच आहे, गुण दोष दोन्ही पद्धतींत आहेत पण आपण एक गोष्ट मुख्य समजून ती ज्यांत साधेल तो मार्ग मोकळेपणे स्वीकारणे हेंच योग्य होय. पण मुलगी मोठी होऊं द्यायची, तिला चांगला नवरा कोणता, वाईट कोणता हें समजूं द्यायचे, तिला एक दिवसांत दहा नवरे दाखवावयाचे व मग आपल्या मनाला वाटेल तो नवरा तिला करून द्यावयाचा याचा अर्थ काय. तसेंच लहानपणीच मुलीला सासरी पाठवून एकत्र कुटुंबाचा तिला एक घटक करणे हें एक प्रकारें योग्य व या प्रमाणें लहानपणापासून ती त्या घरांत वाढल्यामुळें तिचा तेथें एक जीव होणे सुलभ व शक्य पण असते. तसेंच मुलगी मोठी झाल्यावर तिचे लग्न करून लागलीच तिला निराळे घर करून देणे व नवऱ्याचे आईबापांना पण तिने परकी समजणे हें एक प्रकारे योग्य, नव्या घरांत ती स्वतंत्र मालकीण असल्यामुळें तिला कसलाहि मोळा असणेची जरूर नाहीं, पण मुलगी मोठी करावयाची, तिला एक प्रकारचे वळण व त्याचा अभिमान लावावयाचा व मग तिला दुसऱ्या घरीं पाठवून दहा माणसांशी भांडायला लावावयाचे याला कोणता शहाणपणा म्हणायचा, स्वतंत्रपणे वागायला शिकलेल्या तरुण पोरीला दुसऱ्याची ताबेदारी व परक्या दहा माणसांचे मनाप्रमाणें कसें वागतां येईल हे कोणीच पहात नाहीं, पातिव्रत्य म्हणजे अत्यंत महत्वाची गोष्ट, दुसऱ्या पुरुषाबद्दल वासना मनांत सुद्धां येऊं नये, म्हणून वासना उत्पन्न होणेपूर्वी पासून त्या वासनेला एक वळण लावणे व तसे वागणे हे एक प्रकारे योग्य, तसेच नवरा म्हणजे एक बाजारांतील जिन्नस आपल्याला पसंत पडली तर घेतली नकोशी वाटली तर टाकली असे समजणे व त्या प्रमाणे वागणे हें एक प्रकारें ठीकच. पण तोंडानें नवऱ्याला देव म्हणावयाचे व हातानी त्याला यःकश्चित पदार्थाप्रमाणें वागविणे किंवा देवाग्निसाक्षीनें लग्न लावून एक धोतर फाटले तर दुसरे घेतात तसे नवरा मेला तर दुसरा करणे याला काय म्हणावे, पुरुष एक

बायको मेली तर दुसरी व मग तिसरी अशा दहा बायका करतो तर बायकांनी पण तसे कां करूं नये मणाणाऱ्यानी कपाचिगीची दुकानें असतात तशी फक्कडांची दुकानें घालून देऊं नयेत किंवा पुरुष आगगाडींत धक्काबुक्की करतात तशी बायकांशी करूं देऊं नये या विसंगतपणाला काय ह्मणावें. तात्पर्य आपण हल्ली मोठ्या चमत्कारीक अवस्थेत आहोत. मागचे काठीचा आधार आमचा सुटला आहे व दुसरी काठी आमचे हातीं आलेली नाहीं व यामुळें आमचे वर्तन धरसोडीचें व विसंगत होते, अशा वेळीं पहिली काठीच धरण्याकडे आपली प्रवृत्ति व्हावी व आपली पूर्वपरंपरा धरून आपण आपल्या विशिष्ट संस्कृतीलाच चिकटून बसावें हेंच योग्य, आपली संस्कृति सर्वतोपरी सोपपत्तिक व योग्य आहे. अनेक वर्षांचे अनुभवानें ती उत्तम ठरलेली आहे अनेक पिढ्यांचे संस्कारानी ती आपले अंगवळणी पडलेली आहे यासाठी तिचाच आश्रय केल्याने आपले कल्याण होणार आहे हे प्रत्येकानें लक्षांत ठेवावें, खादीच वापरून जसें आपण कापडांत मागे सरत आहोत, दारू सोडून जसे आपण फिरून मागचे मुक्कामाला जात आहोत, त्याच प्रमाणें आपले धार्मिक व सामाजिक निर्बंध पाळूं लागून आपण मागील मुक्कामावर जाऊं तेव्हां आपणास जुन्या पायावर चांगला धर सांपडून आपले कल्याण होईल,

विवाह झाल्यानंतर पदर देणे हे समावर्तन होऊन रजोदर्शन हा संस्कार स्त्रियांना उक्त आहे, रजोत्पत्ति आठवे वर्षांपासूनच होते, पदर देणेचे वेळीं ते रज फूल रूपांत असते तें आतां फळ रूपांत येऊन त्याच्या बिया बाहेर पडूं लागतात, रजाचे प्रत्यक्ष दर्शन होते डोळ्यानी रज दिसते, हातांनीं त्याचा स्पर्श समजतो त्याला रजोदर्शन म्हणतात, मुलगी दहा वर्षांनंतर रजस्वला झाली असे

अष्टवर्षाभवेत्कन्या नववर्षातुरोहिणी ॥
दशवर्षाभवेद्गौरी अत उर्ध्वंरजस्वला ॥ १ ॥

शास्त्र ह्मणते याचा अर्थ ती पदर देण्याला योग्य झाली, रज तिच्यात उत्पन्न झाले मात्र ते अद्याप वाहूं लागले नाहीं ते रज वाहूं लागले म्हणजे

रजोदर्शन झाले. रजोदर्शन झालेलें स्त्रीने इकडे तिकडे हिंडूं नये, चोहो कडे रज लागेल यासाठीं एका जागी बसावे. रजोदर्शनाततीं गर्भधारणेस योग्य झाली यासाठीं ती पुरुषांस मोह उत्पन्न करील ह्मणून तिनें अस्पृश्य रहावें व ब्रह्मचर्यानें वागून हा रजाचा पूर ओसरूं द्यावा. रेत व रज ही प्राणीमय असतात, या प्राण्याला सूर्यदर्शन झाले तर ते मरतात व त्यांची भूतयानीं उत्पन्न होते. या पासून रोग बीजे पण उत्पन्न होतात ह्मणून रेत-स्खलन होतांच शौच अगर स्नान करावे ह्मणून सांगितले आहे. रजोदर्शनांत तर रज वहात राहणार तेव्हां स्नान अशक्य ह्मणून चार दिवस तो पूर ओसरेपर्यंत अस्पृश्यत्व सांगितले आहे. रेतस्खलन व रजो-दर्शन ह्या दोघातही अस्पृश्त्व सारखेच आहे पण रेतस्खलन लागलीच थांबते तसे रजोदर्शनांत होत नाहीं ह्मणून वागणुकींत भेद दिसतो ही गोष्ट शास्त्रकारांचे विषमतेला दोष देणारांनीं लक्षांत ठेवावे, स्त्रियांना अस्पृश्य ठेवण्यांत स्वच्छता, आरोग्य, व मुलांचा चोकसपणा या गोष्टीकडे शास्त्र-का रांनीं लक्ष दिले आहे व ते सर्वतो परी योग्य आहे असें प्रत्येक विचारी माणसाला वाटेल

रजोदर्शन संस्कारांत एक मखर घालून त्या मखरांत तिला बसवि-तात. मग तिला तिच्या मैत्रीणी कडून वाढणी येतात. लग्नांत ताशे, वाजंत्री वगैरे वाजवून मोठा उत्सव करतात तो आजपर्यंत स्वैर असलेली दोन माणसे एक स्त्री व एक पुरुष ही यापुढें मनुष्यपणांत आली हें प्रसिद्ध करणेसाठीं असतो. बाकी लग्न समारंभाचे धार्मिक उत्सवांत ताशे वाजंत्र्याचे खरोखर कांहीं काम नाहीं पण मनुष्य उत्सवप्रिय आहे दोन प्राणी जनावरांच्या जन्मातून मनुष्यपणांत आली हें कांहीं आनंद मानण्याजोगे लहानसहान कारण नव्हे. दोन प्राणी माणुसकीला लायक झाले हें मोठेच काम झाले, तसेंच आपले आईबापाचे ऋणांतून मुक्त होण्यासाठीं स्वार्थावर जिने पाणी सोडलें व जी पति देवाच्या भजनी लागली ती त्या कामाला योग्य झाली यासाठीं हा रजोदर्शनाचा संस्कार

व उत्सव असतो. लिंगानें स्त्री असून सुद्धां या कामाला नालायक असे प्राणी असतात पण ही एक व्यक्ति तशी नाहीं व आतां लवकरच ती आपले उद्दिष्ट सिद्ध करून दाखवील यासाठीं त्या मुलीच्या आईबापांना, सासुसासऱ्यांनां, आप्तइष्टांनां, मैत्रीणीनां मोठा आनंद होत असतो व तो आनंद मखर घालून, उत्सव करून, वाढणी आणून आपआपल्यापरी प्रत्येक व्यक्ति व्यक्त करीत असते. रजोदर्शन माहेरी झाले तर सासरच्या मंडळीना व सासरी झाले तर माहेरच्या मंडळींनां आनंदाची ही बातमी साखरपुड्या बरोबर कळवीत असतात. रजोदर्शना नंतर एक दिवशीं जितक्या मंडळींकडून वाढणी आली तितक्या उलट मेजवानी म्हणून जेवायला बोलावतात. उपकाराची फेड उपकारानीं करण्यास न चुकणेवर शास्त्रकारांचा फार कटाक्ष आहे. अहेरास प्रतिअहेर, आमंत्रणास आमंत्रण जेवणास जेवण अशी प्रत्येक उपकाराची उपकारांनीं फेड करावयाची असते. या प्रमाणें रजोदर्शनाचा उत्सव होत असला म्हणजे ती मुलगी पण मोठी खुष व उत्साही असते व अशा उत्साही व आनंदी मुलीला संभोग सुख चांगले मिळून चांगली मुलेंबाळे होण्याचा फार संभव असतो व यासाठींच शास्त्रकार स्त्रियांनां नेहमी संतुष्ट व आनंदी ठेवावे असें सांगतात.

रजोदर्शन झाले म्हणजे मुलीला उत्सवाचे योगानें आनंद व उत्साह वाटत असतोच पण खरा उत्साह तिला दुसऱ्याच एका विचारानें वाटत असतो. ज्या पतिदेवाकडे आपणांस आज पर्यंत फक्त चोरट्या नजरेने पहावे लागे, ज्याच्याशी बोलण्याची आपणांस आजवर बंदी होती त्या पतिदेवाची आपली एकांतात गांठ पडेल, त्यांच्याकडे आपण डोळे भरून पाहूं पोटभर त्यांच्या बरोबर आपण गोष्टी सांगू, त्यांच्या चुंबनालिंगनादिकांचा आपणांस लाभ मिळेल या विचारानें ती अगदीं गुंग झालेली असते. अगोदर रजस्वला ती झाली म्हणजेच पुरुषांनी आपणांस कुरवाळावे, आपले कोड कौतुक करावे असे मुलीला वाटत

असते व यासाठीं दुसऱ्या पुरुषावर यावेळीं तिचें मन जाऊं नये म्हणून तिचें अगोदर लग्न करावयाचे. मग रजोदर्शन झाल्यावर एक प्रकारच्या गुदगुल्या होऊन तिला विषय वासना उत्पन्न होते व रजोदर्शनापासून सुमारे सोळा दिवस ही इच्छा रहाते गोड किंवा रुचकर पदार्थ पाहिला किंवा त्याचा वास आला ह्मणजे जसे तोंडास पाणी सुटते व पोटांत चल-बिचल सुरू होते तशीच स्थिती या विषयवासनेची असते. विषयवासना उत्पन्न झाली म्हणजे सर्व अंग शिवशिवते, मनाला एका तऱ्हेचा हुरुप येतो, स्तन स्फुरण पावू लागतात गुह्येंद्रियांत चळवळ सुरू होते या सर्व प्रकारामुळें रजोदर्शन झालेल्या मुलीत एक प्रकारचा विलक्षण चंचलपणा आलेला असतो, तिला एक प्रकारच्या सुखाचा अनुभव येत असतो. ती विलक्षण तऱ्हेची मनोहर व सुंदर दिसते, निराळयाच प्रकारचा मोहक-पणा तिच्या अंगावर येतो व म्हणून

प्राप्तेतु षोडशेवर्षे गर्दभ्यप्यासरायते ॥

असे सुभाषितकार ह्मणतात. रजोदर्शन झाले म्हणजे कुरुप स्त्री असली तरी तिच्यावर एक प्रकारचे तेज येते व त्यामुळें ती सुंदर दिसूं लागते. प्रजोत्पादनाला मदत व्हावी ह्मणून सृष्टीची ही विलक्षण योजना आहे. या नंतर जर त्या मुलीला पुरुषसंग झाला नाहीं तर तिचा हिरमोड होऊन ती मोडकळीला येते. उत्साहभंग हे त्याचे कारण आहे. वनस्पतींत सुद्धां असा उत्साहभंग होऊन फुले कोमेजून जातात मग स्त्रिया तर माणसे विकारयुक्त माणसे आहेत.

लग्नामध्येंच नवरा बायकोची भेट होऊन खेळखेळणें, विडा तोडणे वगैरे प्रकारांनी त्यांचा थोडासा परिचय होतो. पुढें एकमेकांशीं बोलणे वगैरेची जरी त्यांस मनाई असते तरी मुकाख्यांनी अनेक गोष्टींनी ती एकमेकांचीं मने ओढून घेत असतात. मग रज उत्पन्न होऊं लागले ह्मणजे हा माझा नवरा अमक्या तमक्यापेक्षां असा असा चांगला आहे असें मनांत येउन मलीचे मनांत व अशाच विचारानें मलाचे मनांत तिज-

विषयीं प्रेम उत्पन्न होत असते. एकमेकांचे दोष न पहाणें, एकमेकांचें गुण वाढविणे, एकमेकांचे प्रेम आपलेवर बसेल असें मागणेकडे दोघांची प्रवृत्ति असते व वडील माणसे ही प्रवृत्ति हितकर रीतीनें वाढेल असे करीत असतात. इंग्रजी Conrtship मध्यें सुद्धां असें प्रेमवर्धन होत असते पण तेथें स्पर्धा असून जिंकण्याची इच्छा असते. हा माझा नवरा ह्मणून तो मला प्रिय अशी बुद्धी तेथे नसून हा माझे मनोरथ पूर्ण करतो, हा मला जास्त आवडतो ह्मणून तो प्रिय असा मनोदय तेथें असतो. कांहीं न आवडण्यासारखा प्रकार झाला तर तेथें प्रेमभंग होतो किंवा ते दुसऱ्यावर जडते पण तेथें अगोदर नवरा व मग प्रेम असे असल्यानें कोणाची स्पर्धा नसते, आवडनिवड नसते व यामुळें प्रेमभंग होणेचा संभव नसून प्रेमाची सारखी वाढ होत असते. अनेक लहान मोठ्या गोष्टींत गुपचिपपणे एकमेकांनी एकमेकांस मदत करणे यांनीं हा प्रेमौघ वाढत असतो. तारुण्य व रजोदर्शन व यामुळें येणारे सौंदर्यानें या प्रेमांत भरच पडत असते व रजोदर्शनानंतर जेव्हां गर्भाधानाचा दिवस ठरविण्यांत येऊन अमुक दिवशीं गर्भाधान होणार हे एकमेकांस कळते तेव्हां एकमेकांस प्रेमाच्या उकळ्या फुटत असतात. या वेळीं या जोडप्यास जे अवर्णनीय सुख वाटत असते तसें सुख हल्लींच्या जोडप्यांनां कल्पनेने सुद्धां अनुभवतां येणार नाहीं. प्रौढपणीं विवाह, गर्भाधारनापूर्वी चोरून संभोग, व उत्सुकता उत्पन्न होणपूर्वीच अनुभव व यामुळें या प्रसंगाची गोडी व बिरी जाते.

गर्भाधानाच्या दिवशीं नवरा बायको अग्नीची पुजा व चांगली संतती देणेबद्दल अग्नीची प्रार्थना करून वडील मंडळीचा या दंपत्याला आशिर्वाद मिळतो. स्त्रीचे नाकांत त्या दिवशीं नवरा हरळीचा रस पिळतो यावेळीं दोघांची अगदीं एक नजर होऊन जाते. हरळीचा रस हा संततीवर्धक आहे व स्त्रीचे डोकें मांडीवर घेऊन शांतपणे तिच्या हनवटीला हात लावून नाक वर करून त्या नाकांत रस पिळणेमुळें दोघांचे मनांत

विलक्षण चैतन्य उत्पन्न होते. मग संध्याकाळीं मुलीची ओटी भरून तिला नवऱ्याचे सेवेसाठीं पाठवितात. निजण्याचे खोलींत आल्यावर दरवाजा बंद करून ती स्त्री पतिसेवेला सादर झाल्यावर तिच्या मनांतल्या सर्व आजपर्यंतच्या कल्पनेने अनुभवलेल्या गोष्टी तिला प्रत्यक्ष अनुभवास येतात व यामुळें तिला आतिशय आनंद होतो या प्रमाणें शास्त्रांनी सांगितल्या रितीनें संयोग झाल्यावर संभोग सुखाची अनुपमेय सुखस्थिती अनुभवतां येते. बालविवाहापासून पायरीपायरीनें मिळालेले हे सुख इतर जोडप्यानां मिळणे शक्य नाहीं. ज्या प्रमाणें पक्वान्नाचा उत्तम स्वाद येण्यासाठीं चांगली भूक लागावी लागते, ते उत्तम प्रकारें केलेले असावे लागते व ते बेताने नियामितपणे सावकाश खावे लागते. यापैकी कोणचीही एक गोष्ट कमी असली तर पक्वान्नाचा स्वाद पूर्णपणे मिळणार नाहीं तीच गोष्ट स्त्री संभोगाची आहे. जशी भूक लागल्याशिवाय पक्वान्नाला पूर्ण गोडी नाहीं त्या प्रमाणें रजोदर्शन झाल्याशिवाय संभोगाला गोडी नाहीं ज्या प्रमाणें पक्वान्न शिळे अगर थंड झाले म्हणजे त्याची गोडी कमी होते त्याच प्रमाणें रजोदर्शनाचा बहार निघून गेला म्हणजे त्याची गोडी कमी होते. ज्या प्रमाणें पक्वान्न नीट रितीनें केलेले नसले ह्मणजे त्याला खमंगपणा कमी येतो त्याच प्रमाणें संभोग शास्त्राप्रे प्रमाणें घेतला नाहीं म्हणजे त्यांत गोडी कमी पडते. ज्या प्रमाणें पक्वान्न सावकाश चावून खाल्ले ह्मणजे अधीक रुचकर लागते त्याच प्रमाणें संभोग वडील माणसांचे परवानगीने शांतपणे, यथास्थित घेतला म्हणजे त्यांत जास्त शिवाय जसे पक्वान्न बेतानें खाल्ले म्हणजेच त्यांत सुख होते त्याच प्रमाणें संभोग पण बेताचा झाला म्हणजे त्यांत सुख असते. भूक नसतानां, फराळ केल्यावर, पक्वान्नाची काय गोडी त्याच प्रमाणें हजार ठिकाणीं तोंड घातल्यावर, प्रेम नसताना, चोरून घेतलेल्या रजोदर्शना पूर्वीच्या संभोग सुखांत काय मजा आहे. पोट भरेल, ढेकर येईल, अंगांत चकवा येईल पण ती खुबी कीं जिची आठवण जन्मभर आनंद देईल ती या जेवणांत

नाहीं त्याच प्रमाणें, संभोग घडेल, मुलें होतील सर्व कांहीं होईल पण ज्या सुखाचे अनुभवानें ब्रह्मसुखाची रुचि समजेल असें ते सर्वांग सुंदर सुख ज्याच्या नुसत्या आठवणीनी डोळयांत आनंदाश्रु उभे रहातील, ज्या स्मरणाचे जिवावर जन्मभर वैधव्य कंठतां येईल ते अनुपमेय व अवर्णनीय सुख वाटेल तसें स्वैर वर्तन करणारांना कोठून मिळेल? त्यांच्या अयोग्य वर्तनाला हें सुख न मिळणें ही कांहीं लहानसहान शिक्षा नाहीं. ब्रह्मानंदाचे खालोखाल सुख या संभोगानंदांतच आहे. जगांत एक रतिसुखच सुख होय. दुसऱ्या प्रत्येक सुखांत दुःखाची कांहीं तरी छटा असते. कशाचा तरी नाश होऊन तीं सुखें मिळत असतात अगदीं निर्मळ अशी सुखें म्हणजे [१] ब्रम्हसाक्षात्कार [२] रतिसुख [३] स्तनपानसुख [४] विद्यादानसुख ही याच अनुक्रमानें आहेत. ब्रह्मसाक्षात्कार करून देतांनां गुरुच्या डोळ्यांनां पण आनंदाश्रु येतात व शिष्याच्या पण येतात. दोघानांही अत्यंत आनंद यावेळीं होत असतो. सर्व जगाचा या वेळीं विसर पडलेला असतो. तीच स्थिती संभोग सुखाची या संभोग सुखांत द्वैताचे भानच रहात नाहीं. आपण दोन आहोत व संभोगापासून सुख होत आहे अशी आठवण सुद्धां नसते, सर्वेंद्रियांना एका सुखाचा मात्र अनुभव येत असतो. स्तनपान सुखांत पण स्तन पिणाराला व पाजणाराला असाच निरतिशय आनंद होत असतो. काळ, स्थळाचे भान त्यावेळीं असत नाहीं व तीच गोष्ट विद्यादानाची. विद्यादानांत शिकणाराला व शिकविणाराला दोघांनांही फार आनंद होत असतो. हा आनंद सगळयांत कमी दर्जाचा आहे पण खरा आनंद आहे.

असा पूर्ण संभोग ह्मणजेच गर्भाचे आधान, नाहीं तर ते रेतःसेचन झालें. इतर प्राण्यांत प्रत्येक वेळीं असाच पूर्ण संभोग घडतो व म्हणूनच ते अमोघवीर्य आहेत. माणसांचे मन चावट झालेले असल्यामुळें त्याचे मन कोठें तरी गुंतलेले असते व यामुळें प्रत्येक वेळीं गर्भाधान न होऊन नुसते रेतः सिंचन होते. शरीराचा धर्म आहे तो शरीर करून जाते.

स्वप्नांत सुद्धां सर्व व्यवहार खोटे पण रेतपात खरा असतो. तसेंच भोगांत तुमचे मन तेथें नसले तुम्हाला नीट भुक नसलीं अन्न बरोबर शिजविलेले नसले, तुम्ही ते कसेतरी घशाखालीं घातलेत तरी शरीर आपली क्रिया करणार. अशा व उगीच क्रिया तुम्हीं त्याला फार वेळ करावयाला लावलीत तर ते बिघडेल ते नीट काम करणार नाहीं ते व्यंग किंवा विकल होईल. त्याला जपणे हें तुमचे काम आहे, त्याची योग्य जोपासना तुम्ही केली पाहिजे. शरीर बोलून चालून नोकर त्याला ' उठाव बोजा ' म्हटले म्हणजे ते बोजा उठावणार. त्याचे कडून योग्य काम तुम्ही करून घेतले पाहिजे. तुम्ही योग्य रितीनें वागवाल तर ते आपले काम बरोबर करील. माणसाला सुद्धां अमोघवीर्य रहातां येते शास्त्राप्रमाणें वागले तर अगदीं एकाच संभोगांत हटकून गर्भधारणा होते असा अनुभव आहे व हा वाटेल त्याला वाटेल त्या ठिकाणीं घेतां येईल. शास्त्रे ही अनुभव पाहुनच बन-लेली असतात. एका माणसाला आलेला अनुभव व त्याने दुसऱ्यांचे माहितीसाठीं नोंदून ठेवलेला असतो व हाच अनुभव तंतोतंत पुष्कळ जणांना आला म्हणजे तो शास्त्राचा नियम होतो मग कोणी ज्ञानी तत्व-वेत्ता त्या नियमाची उपपत्ती लावतो व मग त्या नियमाचे सोपपत्तिक विवेचन झालें असें म्हणतात व जो पर्यंत अनुभव बरोबर येत असतो तो पर्यंत तो नियम बरोबर. अनुभव चुकला म्हणजे नियम चुकला व त्यांत दुरुस्ती केली पाहिजे. शास्त्र या प्रमाणें जन्मास येतात.

गर्भाधान झाल्यावर जिला आपण आतांपर्यंत मुलगी म्हणत होतो तिला आईपण येते व तिच्या पोटांतील गर्भाचे पुंसवन व सीमंतोन्नयन संस्कार हिच्या विद्यमाने होतात. पण ते हिचे संस्कार नव्हेत, गर्भा-धानानंतरचा आईचा संस्कार म्हणजे डोहाळजेवण होय, गर्भ पोटांत असतांनां आपल्या पूर्वकर्मानुसार वाढत असतो व त्याच्या वाढीला लाग-णाऱ्या सर्व वस्तु त्याला आपले आईचे मार्फतच मिळवाव्या लागतात. बाहेर पडल्यावर जरी तो आईचे अंगावर पीत असला तरी हवेंतून

स्वतंत्रपणे कांहीं जिनसा त्याचे शरीरांस मिळत असतात. शिवाय पाणी न्हाणे, माखणे, वस्त्र वगैरेनी पण पुष्कळ कर्मभोग त्याला भोगतां येतात पण पोटांत असल्यावेळीं आई वांचून त्याला कोणताच भोग मिळू शकत नाहीं. तेथें श्वासोश्वासाला हवा नसते इतकेंच नव्हे तर आवाज; शितोष्ण वगैरे गोष्टी पण तेथें नसतात व यामुळें त्याला वासना तृप्त होऊन कर्म-भोगासाठीं आईची मनधरणी करावी लागते व याला डोहाळे असें नाव आहे. आईच्या स्वतःच्या वासना तिच्या आतांपर्यंतच्या आयुष्यांतील मिळालेल्या भोगांनां अनुसरून असतात. पण मुलाच्या वासनेनें मिळ्या झाल्यानें गर्भारपणीं तिच्या वासना बदलतात तिला गोड नेहमीं आवडत नसले तरी या वेळीं आवडते इतकेंच नव्हे तर गोडाशिवाय दुसरा पदार्थ पचत नाहीं उलटून पडतो. या प्रमाणे खाण्याचीच नव्हे तर इतर सर्व गोष्टींत तफावत पडते व या तफावतीला लक्षांत घेऊनच " मुलाचे लक्षण डोहळ्यावरून समजते " अशी ह्मण पडली आहे. हे डोहाळे मुळीच न पुरविले तर गर्भाला अपाय होतो या साठीं ते पुरवितां येतील तितके पुरवावे. ते वाईट असल्यास त्यास सुधारणेचा प्रयत्न करावा व या करण्याला डोहाळजेवण असें नांव आहे. नावांत फक्त जेवणाचाच उल्लेख आहे पण त्याचा हेतु, मतलब तेवढाच नाहीं. नानाप्रकारानीं डोहाळे पुरवून गर्भार स्त्रीला संतुष्ट ठेवावे व गर्भाचे वाढीस मदत व्हावी हा या कामांत उद्देश आहे. मात्र गर्भारपणीं फार श्रम करणे अगर मुळीच श्रम न करणे व शौचास साफ होणे या गोष्टीला जपावे. फार श्रम केल्यानें गर्भाचे वाढीस पुरेसे अन्न मिळत नाहीं. मुळींच श्रम न केल्यास गर्भ फार वाढून प्रसूतिच्या वेळीं त्रास होतो. गर्भाचा बोजा आंतड्यावर पडून त्याचे काम बरोबर होत नाहीं व यामुळें शौचास न होऊन शरीर प्रकृतीस अपाय होतो या साठीं या गोष्टीस जपावे लागते. वाईट डोहाळे होत असतील तर अनुष्ठान, व्रत, नियम, तप वगैरे करून असें वाईट डोहाळे करणारे पाप नाहींसे होईल अशी तजवीज करावी.

या बाबद कश्यप व दिती यांचे उदाहरण सांगणें सारखे आहे. कश्यप महर्षिंच्या दिती बायकोपासून त्यांनां हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपु असें दोन दैत्य झालें व अदितिपासून इंद्र वगैरे देव झालें. या दोन सवती एक-मेकींचा फार द्वेष करीत व तोच द्वेष या मुलांत पण होता. पुढें इंद्राचा कैवार घेऊन भगवान् विष्णुनीं हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपु या दोघांनांही मारलें. तेव्हां इंद्राला मारणारा मुलगा आपणांस व्हावा असें दितीला वाटलें. हा हेतु सफल होणेसाठीं तिनें कश्यपऋषींची फार उत्तम सेवा पुष्कळ काळ केली. या सेवेनें संतुष्ट होऊन कश्यपऋषींनीं तिला वर माग म्हणून म्हटलें तेव्हां तिनें त्यांनां आपली इच्छा सांगितली ते ऐकून त्यांनीं तिला गर्भारपणीं एक व्रत करणेस सांगितलें, ते खाली दिल्या प्रमाणें:—

नहिंस्याभ्दूतजातानि नशपेन्नानृतंवदेत् ॥
नछिन्ध्यान्नखरोमाणि नस्पृशेद्यदमंगलम् ॥ १ ॥
नाप्सुस्नानान्नकुप्येत नसंभाषेत दुर्जनैः ॥
नवसीताधौतवासः स्रजंच विधृतांक्वचित् ॥ २ ॥
नोच्छिष्टं चण्डिकान्नंच सामिषं वृषलाहृतम् ॥
भुञ्जीतोदक्ययादृष्टं पिबेदंजलिना त्वपः ॥ ३ ॥
नोच्छिष्टास्पृष्टसलिला संध्यायांमुक्तमूर्धजा ॥
अनार्चितासंयतवाक्ना संवीताबहिश्चरेत् ॥ ४ ॥
नाधौतपादाप्रयता नार्द्रपान्नोउदक्शिराः ॥
शयीतनापराक्नान्यैर्ननग्नानच संध्ययोः ॥ ५ ॥

तात्पर्य सर्व वाईट गोष्टी यांत टाकणेस सांगितल्या आहेत व असें झालें म्हणजे गर्भ सर्व वाईट वासनापासून मुक्त होईल. दितिनें ते कबूल केलें व त्या प्रमाणें त्या गर्भारपणी ती वागली. इंद्राला ही गोष्ट समजतांच तो तिच्या सेवेस राहिला व तिच्या पोटांत शिरून त्यानें त्या गर्भाचे सात तुकडे केलें. कोणाचाही घातपात न इच्छिणाऱ्यां त्या दितिचा गर्भ तुकडे केलें तरीं जिवंत राहिला. इंद्रानें त्या प्रत्येक तुकड्याचे फिरून सात सात तुकडे केलें तरी ते मुलगे मेले नाहींत. हें पाहून इंद्र मात्र घाबरला. इतक्यांत दिति बाळंत झाली व तिला इंद्रा सुद्धां पन्नास मुलगे

झालें. मुलगे इतकें झालेले पाहून तिला आश्चर्य वाटलें. तिनें कश्यपा-पाशीं एक मुलगा मागितला असून हे पन्नास मुलगे झालें हें काय असें तिला वाटलें. पुढें हे पन्नासही मुलगे एकमेकांशी भावाप्रमाणें प्रेमानें वागले. या एकुणपन्नास मुलांना मरुत देव असें म्हणतात व हें मरुत देव दितीचे मुलगे असून सत्वगुणसंपन्न होऊन देवत्व पावले व त्यांनीं इंद्राला किंवा इंद्रानें त्यांनां मारलें नाहीं. या प्रमाणें आईला इंद्राला मारण्याची मोठी इच्छा असून सुद्धां चांगल्या व्रताचे योगानें मुलांत ही बुद्धि उत्पन्न झाली नाहीं व ते इंद्राचे शत्रु न होता भाऊ झालें. सगळ्या वाईट डोहाळ्याना हाच रामबाण उपाय आहे.

गर्भारपणानंतर स्त्रियांचा पुढचा संस्कार म्हणजे बाळंतपण, हे बाळंतपण फार बिकट असतें. एवढ्याशा योनीतून इतकें मोठे मूल बाहेर पडावयाचें वेळीं ज्या यातना होतात त्या बाळंत झालेल्या स्त्रीसच ठाऊक. ज्या प्रमाणें शौचास होणें, लघवी होणें रजोदर्शन होणे त्याच प्रमाणें बाळंतपण ही स्त्रियांची स्वाभाविक अवस्था आहे व हिला खरोखर त्यांनीं भिण्याचे कारण नाहीं पण कित्येक स्त्रिया या बाळंतपणाचे भीतिनें पुरुष संगाचे वेळीं अंग चोरतात व वांझ होतात. पुरुष संगानें गर्भधारणा होईल व मग गर्भारपणचे त्रास, बाळंतपणचे त्रास, वगैरेचे चित्र त्यांचे डोळ्यापुढें उभे राहून त्यांच्या अंगावर शहारे येतात व त्यामुळें अंग चोरून पुरुषसंगाचे अनुपम सुखाला व त्या बरोबरच पुत्रसुखाला त्या अंतरतात. बाळंतपणाचे वेळीं फार कष्ट होतात ही गोष्ट खरी पण त्यासाठीं भिण्याचे कारण नाहीं, हजारो किंवा लाखो बायांत एखादीच बाई या बाळंतपणाचें कष्टानें मृत्युमुखी पडली आहे व एकंदर स्त्रीप्राणी वर्गाकडे पाहिलें तर हें मृत्युचे प्रमाण त्याहूनही अल्प असेल. इतका दुःखाचा अंश सर्वच गोष्टींत आहे. फार जेवून किंवा अन्न न मिळाल्यानें मरणारे प्राण्यांचे पण इतकें प्रमाणें सहज आहे तरी कोणी जेवण सोडीत नाहीं व हीच गोष्ट मुलें होणे व बाळंतपण यांची.

पहिल्या रजोदर्शनाचे वेळीं तसेच पहिले बाळंतपणाचे वेळीं मुलगी माहेरा असलेली बरी. या दोन्ही गोष्टी जननेंद्रिया संबंधी असल्या मुळें मुली या बाबद लाजतात व त्यामळे अपाय होण्याचा संभव असतो म्हणून निर्भयपणे व मोकळ्या मनानें ज्या माणसापाशीं आपले सुखदुःख त्यानां सांगतां येईल असे माणूस तेव्हां जवळ असावे. बाळंतीणीची खोली अगदीं एका बाजूस असावी व तिचे रडणे ओरडणे पुरुषाचें कानीं जाऊं नये म्हणून शास्त्र सांगते त्याचा उद्देश इतकाच कीं या वेदना एकून त्या पुरुषानां वैराग्य येईल, वाईट वाटेल व त्यामुळें ते व ती स्त्री ही संसार सुखाला मुकतील पुरुषांचें कानीं रडणे जाईल म्हणून ती स्त्री लाजेल, लाजली तर योनी संकोच होईल व बाळंतपण लांबेल हा पण त्यांत उद्देश आहेच. या कामी लाज वाटणें फार घातक आहे. शिवाय वेदनाचे वेळीं होणारी आरडाओरड दाबून धरणें पण फार घातक आहे. यावेळीं बाळंतीणीला संकोच वाटू नये पुरुषांनी लांब जावे व तिला मोकळेपणी आरडून ओरडून मोकळी होऊं द्यावी. गर्भारपणापासूनच स्त्रियावर एक निराळी जबाबदारी येउन पडते व ती म्हणजे गर्भ संरक्षण ही होय. ज्या ज्या गोष्टींपासून गर्भाला अपाय होईल त्या सर्व गोष्टी गर्भारशीनें टाकावयाच्या असतात बाळंत होतानां व झाल्यावर तर ही जबाबदारी जास्तच वाढते, मुलाचे हितासाठीं तिला आपली इच्छा, वासना, तब्येत बाजूस ठेवावी लागते, मुलाला अपाय किंवा रोग होऊं नये असें पथ्याचरण तिनें ठवावे.

बाळंत झालेल्या स्त्रीची जखम भरून येणेस व सर्व इंद्रिये पूर्वस्थितीस येणेस सरासरी दहा दिवस लागतात व तेथपर्यंत ती अस्पृश्य समजणेची चाल आहे. बाळंतीणीची खोली वगैरे बद्दल विचार पुरुषांचे संस्कार या तिसऱ्या पुस्तकांत दिले आहेत. मुख्य गोष्ट म्हणजे नवीन जन्मलेले मूल एकदम आईचे पोटांतून बाहेर पडल्यावर निराळे परिस्थितीत पडते व हा भेद जितका सावकाश पडेल तितका चांगला म्हणून

बाळंतीणीची खोली गडबड वगैरे पासून लांब, एकसारखी उष्णता असलेली, एकसारखा उजेड असलेली अशी पाहिजे. तान्ह्या मुलाला नवीन इंद्रिये उत्पन्न होणार तेव्हां ती तितकी सावकाश हळूहळू होतील तितकी ती चांगली होतील. यासाठीं शांत माफक उबदार, मंद उजेडाची, वाऱ्याचा झोत वगैरे नसलेली जागा बाळंतीणीस पाहिजे. बारा दिवस झाले म्हणजे कर्णवेध होऊन त्या तान्ह्याचे कानावर गडबड पडणेस हरकत नाहीं, तीन महिनें झालें म्हणजे त्या तान्ह्याचे डोळयावर प्रखर उजेड पडणेस हरकत नाहीं, नऊ दहा महिने झाल्यावर त्या तान्ह्याला विशेष रुचकर किंवा जरा जड अन्न घालणेंस हरकत नाहीं व या गोष्टीला अनुलक्षून शास्त्रकारांनी कर्णवेध, सूर्यदर्शन, अन्नप्राशन वगैरे संस्कार त्या तान्ह्या मुलास सांगितले आहेत. मूल जन्मताच त्याला शक्य तर आईचा चिक पाजावा. हा चिक सारक असून त्याचे कोठ्याला योग्य असतो पण कित्येक वेळा बाळंत होताच स्त्रियानां दूध येत नाहीं, अशा वेळीं मध व एरंडेल यांचा बोळा मुलाला पहिल्यानें चोखवावा व मग त्याला दुधाचा बोळा चोखवून दूध पाजावे. मुलाला पहिल्यानें दूध ओढण्या इतकी शक्ति नसते तेव्हां आईनें आपले थान त्याच तोंडांत घालून ते हळूच दाबावे म्हणजे दुध त्या मुलाचे तोंडांत जाईल. दरदोन तासानीं साधारणपणें मुलास पाजावें. निजल्यानिजल्या मुलांनां केव्हांही पाजूं नये. आईनें बसून मुलाला पाजावें निजल्यानिजल्या मुलाला पाजणेची सवय केली तर मूल पीत असतांना आपणांस झोंप लागते; मुळ त्यामुळें कमीजास्त पिते व पुढें तोंडांत थान धरून निजणेची त्याला खोड लागून आईशिवाय ते निजत अगर रहात नाहीं असें होते मुलाला पुढें जे वळण लागावें असें आपणांस वाटत असेल ते वळण त्याला जन्मापासूनच लावावें. मुलांनीं आधाशी अगर खादाड होऊं नये ह्मणून पहिल्यापासूनच त्यास लागेल तेव्हा व भूके पुरतेंच पाजावे. भूक नसतानां दर रडण्याचें वेळीं त्याला थान देणे तसेंच पोटे भरल्यावर पण उगीच थान तोंडांत धरून

झोंपीं जाणें या गोष्टी वर्ज कराव्या. मुलाला नियमितपणाची संवय लागावी म्हणून त्याला नियमितपणे नेमल्यावेळीं न्हाणें, पाजणें, निजविणें वगैरे गोष्टी कराव्या. प्रत्येक गोष्टीचें माप वेळेचा नियम व पद्धतीचा एक प्रकार ठेवावा म्हणजे मुलें पुढें नियमीत होतात. ती स्वतंत्र व्हावी यासाठीं त्यांच्यावर कोणताही जुलूम करूं नये. त्यांच्या हालचाली मोकळ्या पणे होतील असें करावें. ती कपडे अंगावर कदाचित राहूं देणार नाहींत म्हणूनच त्यांना उबदार खोलींत ठेवावें. ही खोली ९८ अंश उष्णतेची असावी तींत उकडूं नये व थंडी पण वाजूं नये. झोंपेचें वेळीं मुलाला स्वस्थ झोंपूं द्यावे त्याला त्यावेळीं जाग येईल असें कांहीं करूं नये. एखादे वेळी डोळ्यांत काजळ घालणें राहिले तर राहूं द्यावें. ते जागे झाल्यावर मग काजळ घालावे पण त्याची झोंपमोड करूं नये. अशा व्यवस्थित रितीनें राहिल्यास मुलाला केव्हांही दुखणे येणेचे कारण नाहीं. काल वांकडा आहे. यासाठीं तो बदलेल तसतशी आपली वागणूक बदलावी. ऋतु हळूहळू पालटेल तसें आपले वागणेचें धोरण पण हळूहळू बदलावे. ऋतुचे फेरफार प्रमाणें आपण योग्य ते फेरफार केले नाहींत तर दुखणें येणार, दुखणे म्हणजे चूक विसंगतता व ही न होण्याबद्दल आपण जपलें पाहिजे. स्वच्छतेला पण तसेंच जपलें पाहिजे. मुलांचे कातडे फार कोवळे व नाजूक असते व त्यांचे सर्व शरीर फार लवचीक असते यासाठीं त्याला योग्य आकार देणेत आपण शक्य ती दक्षता दाखविली पाहिजे. मुलाला पाळण्यांत निजवितानां एकाच अंगास, एकाच कुशीवर निजविलें असतां त्याचे डोके चपटे होते. लहान मुलांनां पायावर उभे केल्यास पाय फेंकडे होतात. कोवळेपणी मुलानां बसविल्यास पाठीस पोंग येते. डोळ्यावर येणारे मुलांचे केस न सावरले तर ती तिरळी होतात, मुलांचे कपडे तंग झालें तर त्यांचे हात वगैरे वांकडे होतात. मुलांनां मान सांवरणे पूर्वी न जपले तर त्यांची मान वांकडी होते. या प्रमाणें या नाजूक मातीला न जपलें तर अनेक कुरुपता मुलांचे अंगी जडतात. तसेंच

नीट रितीनें काळजी घेतली तर मुलांचे कांहीं दोष घालवितां येतात.

प्रत्येक लेकुरवाळे स्त्री जवळ एक झोळणा पाहिजे व त्यांत मुलां-साठीं लागणारी सौम्य औषधे ठेवलेली असावी व त्यांचा उपयोग तिला ठाऊक असावा. मुलाला मादक पदार्थ केव्हांही कोणत्याही कारणासाठीं देऊं नये. फार रडले, फार हसले, फार रागावले, पुरुषसंग केला, फार जेवलें, फार उपास केला तर अंगावरील दूध बिघडते व हें दुषित दूध प्याल्यानें मूलें आजारी पडतात. यासाठीं लेकूरवाळीनें फार जपून वागावें. कोणतेही बाबींत अतिरेक होऊं नये. निजणे, बसणें, उठणें कामें करणें वगैरे सर्व गोष्टीत लेकुरवाळीनें माफकपणा ठेवावा. बोलतांना सुद्धां तिनें माझी मूलें माझे अनुकरण करतील हें लक्षांत ठेवून वागावे. कर्णवेध वगैरे संस्कार या दृष्टीनें पण महत्वाचें आहेत, कर्णवेध झाला कीं मुलांनां ऐकूं येऊं लागते मग त्यानंतर त्यांचे कानी जाऊं नये अशी भाषा तोंडातून काढतां उपयोगी नाहीं हें आईबापांनीं लक्षांत ठेवावे. सूर्यदर्शन मुलाला झालें कीं मूलांचे नजरेस पडूं नये असें आचरण आईबापांनीं करतां कामा नये. मूलानां अन्नप्राशन करविलें कीं मुलांनीं खाऊं नयें असें पदार्थ घरांत करूं नयेत व आपण खाऊं नयेत, याप्रमाणें मूल झालें कीं आई-बापांनी आपल्या वर्तनावर सक्त नजर ठेवावी.

मुलेबाळें झाल्यावर आईचे कर्तव्य ह्मणजे नवरा मरणेपूर्वी निदान त्याचे बरोबर मरणे होय. नवऱ्यापूर्वी मरण येईल तर ते उत्तमच, मरतांनां सर्वांनां ' शांत राहून आपआपले कर्तव्य आजपर्यंत ज्या दक्ष-तेनें माझे नजरेखालीं केलेंत तसेंच पुढें करीत रहा व मग स्वर्गांत मला भेटाल तेव्हां हिशेब द्या ' असें सांगावें व भगवंताचे नामस्मरण करीत कशांतही मन अडकुं न देतां मरावें. दैवयोगानें असे न घडले व ईश्वरी सत्तेनें पतिदेव अगोदर निजधामास गेले तर वरच्या प्रमाणेंच सर्व मंडळीस निरोप देऊन गंभीरमनानें कशांतसुद्धां मन अडकुं न देतां [ आपणांस ज्या

ज्या घरांतल्या वस्तु फार प्रिय असतील त्या दान देऊन ] नवऱ्याचे चितेवर देह ठेवावा. माझ्या कित्येक भगीनी म्हणतील की इंग्रज सरकारनी कायद्यानें सती जाणे हा गुन्हा ठरविला आहे पण त्यांना इतकेंच सांगावयाचे कीं स्वतःच्या हौशानें किंवा खुषीनें सती जाणारास हा कायदा कांहीं करूं शकत नाहीं. लोकांनी कोणी कोणावर जुलूम करूं नये असें हा कायदा ठरवितो. सती जाण्याची उत्कट इच्छा असलेले स्त्रीला आपली इच्छा पूर्ण करणेस हजारो मार्ग आहेत, खरोखर नवऱ्यांशी एकजीव झालेल्या स्त्रीला नवऱ्याबरोबर आपोआपच मरण येईल. परगांवी नवरा मरतांच घरीं स्वस्थपणे देह ठेवणारी बाई मी पाहिली आहे. भर्तृहरीनामक राजाचे बायकोची गोष्ट सर्व श्रुतच आहे. वैराग्यादि शतके करणारा तो हा भर्तृहरी नव्हे. या भर्तृहरीची गोष्ट अशी आहे कीं हा पत्नीला घेऊन शिकारीस गेला असतां त्यानें एक काळवीट मारला. त्या मृत काळवीटाच्या शिंगावर पडून एका हरिणीनें आत्मत्याग केला व हें राजानें राणीस दाखविलें. राणी त्यावर म्हणाली कीं मृतपति पाहतांच प्राण निघून जावा हे या पेक्षां श्रेष्ठ. हरीणीच्या मरणांत आत्महत्येचा दोष दिसतो. यावर राजानें राणीची परीक्षा करणेचा बेत केला व पुढील शिकारीचे दिवशीं राणीस बरोबर घेतले नाहीं व आपले कपडे फाडून रक्तांत भिजवून राणीकडे पाठविलें. हे कपडे राणीकडे आणले तेव्हां ती तुळशीची पुजा करीत होती. राणीने कपडे पाहतांच निरोप सुद्धा ऐकण्याचे पूर्वींच तुळशीपुढें डोके टेंकून प्राण सोडला. मग राजाला आपल्या कृत्या बद्दल फार वाईट वाटेल व त्यास गोरक्षनाथांनीं उपदेश करून कृत कृत्य केलें. यासाटी ज्या स्त्रीला जसे शक्य असेल तशा रीतीने तिने पती बरोबर सहगमन करावे हा उत्तम मार्ग व हाच स्त्रीचा शेवटचा संस्कार.

असे सहगमन करणें तिला शक्य किंवा इष्ट वाटत नसेल तिनें यानंतर सर्व विषयभोग सोडून विरक्तपणें जगाचे उपयोगी पडत आपले आयुष्य घालवावे. सती जाणे हा पूर्ण यज्ञ असून वैधव्य मार्गानें हा

अपूर्ण यज्ञ होय. वैधव्यधर्म कसा पाळावा व त्याचें मर्म काय हें सविस्तर पुढें आठवे प्रकरणांत सांगितलें आहे. या ठिकाणीं विधवांचे पुनर्विवाहा बद्दल मात्र चार शद्ब लिहिलें पाहिजेत. इंग्रज सरकारचे संसर्गापासून आपल्यांत जी विसंगतता आली आहे तिच्या पैकीच विधवा विवाह ही एक गोष्ट आहे. नवरा म्हणजे फार पवित्र संबधाचा एक पुरुष असें समजणे व त्या बरोबर सती जाणे हा एक रास्त मार्ग किंवा नवरा ह्मणजे बाजारांत घ्यावयाची जिन्नस ती आपले मर्जीप्रमाणें बदलावी म्हणजे हा दुसरा रास्त मार्ग. नवरा बायकोचा संबंध हा एक जन्मापुरता नसून निरंतरचा आहे असें समजून त्याप्रमाणें वागणे हा एक रास्त मार्ग किंवा नवरा बायकोचा संबंध हा एक कायदेशीर करार आहे असें समजून त्या करारचे मुदती-पुरते तसें वागणें हा दुसरा रास्त मार्ग. पण हे दोन्ही मार्ग सोडून आपण हल्लीं विसंगत रितीनें वागत असतो. लग्न हा कायदेशीर करार म्हणून पण आपण तसा कागद वगैरे करीत नाहीं. देव, अग्नी वगैरेचे साक्षीनें आपण लग्न लावतो व मग एक नवरा मेल्यावर दुसरा करावा म्हणतो यांत किती विसंगतपणा आहे व यासाठीं पराशर स्मृतातील एक श्लोक आधार म्हणून पुनर्विवाह पाहिजे म्हणणारे लोक पुढें करीत असतात.

नष्टे मृते प्रवृजिते क्लीबे च पतिते पतौ ॥
पंचस्वापत्सुनारीणांपतिरन्यो—— ॥ १ ॥

या श्लोकांतील क्रियापद काय असावे हाच विचार आपणांस कर्तव्य आहे म्हणून मी येथें तो मुद्दाम दिलें नाहीं.

[१] नष्टे—नवरा अजिबात नाहींसा झाला असेल तेव्हां.

[२] मृते—नवऱ्याचे शरीर आहे पण त्यांत प्राण नसेल तेव्हां

[३] प्रवृजिते—नवऱ्याचे शरीर व प्राण आहे पण भोगाची इच्छा नाहीं.

(४) क्लीबे—नवऱ्यास शरीर प्राण व भोगेच्छा आहे पण शक्ति नाहीं तेव्हां.

(५) पतिते —नवऱ्यास शरीर प्राण, भोगेच्छा आहे पण तो अधर्मानें वागतो तेव्हां.

या पांच प्रकारच्या आपत्ती बायकोवर आल्यातर तिनें दुसरा नवरा करावा असें पुनर्विवाहेच्छु माणसांचे ह्मणणे आहे व या पांच आपत्ती येऊन पडल्या तरी बायकांनीं दुसरा नवरा करूं नये असे कित्येक म्हणतात. पाश्चात्यांचे अगदीं सुधारलेल्या स्त्रिया या पलिकडे एक पायरी जाऊं म्हणतात. व मग त्याचे वर्तन निर्बंद्धस्वैर होते.

(६) रुतौ—नवऱ्याला शरीर, प्राण, भोगेच्छा, शक्ति आहे व तो धर्मानें पण वागतो पण तो मला आवडत नाहीं तेव्हां.

या प्रमाणें निर्बद्धस्वैर आचरण करावे असें शास्त्रकारांचे म्हणणे असावे कां कोणत्याही आपत्तींत दूसरा नवरा करूं नये असें ते म्हणत असावे हें ठरविणें मी वाचकांवरच सोंपवितो. शास्त्रनिर्बंध घालून माणसाचे वर्तन नियमित करणेसाठीं जन्मास येते तेव्हां ज्याला ताळ नाहीं असें स्वैर वर्तन सांगणेकडे त्याची प्रवृत्ती नसावी उलट कडक निर्बंध घालणेकडेच त्याची प्रवृत्ती असावी असें वाटते व म्हणून केंव्हांही स्त्रियांनी दुसरा नवरा करूं नये असें माझें मनाला वाटतें.

पुनर्विवाह करावा म्हणणारे असें विद्वान या बाबद दुसरा एक मुद्दा पुढें आणीत असतात व तो ह्मणजे विधवा विशेषतः बालविधवा यांनां या निर्बंधामुळें होणारे दुःख किंवा कष्ट हा होय. प्लेगमुळें बालविधवा स्त्रिया पुष्कळ झाल्या आहेत, अशा विधवांचे हातून अयोग्य वर्तन घडते यासाठीं त्यांना विवाहाची परवानगी असावी असें त्यांचे म्हणणे आहे. याबाबद आपणाला दोन गोष्टी लक्षांत ठेवावयाच्या आहेत. पहिली गोष्ट ह्मणजे ही कीं ज्या स्त्रिया आपणाला हिंदुधर्मातील अत्युच्च वर्णापैकी म्हणवितात त्यानाच हा विधवा विवाहाचा प्रतिबंध आहे कमी किंवा खालचे प्रतीचे लोकांकरितां हा नाहीं. कोणाही स्त्रीला कमीपणा पत्करून पुनर्विवाह करतां येतो. सामाजिक बाबींत कमीपणा गौणपणा इतकाच दोष हिंदुसमाज अशा स्त्रिला देतो. दुसरी गोष्ट अशी कीं आज पृथ्वीच्या

पाठीवर असा कोणताच समाज नाहीं कीं ज्यांत सर्व स्त्री पुरुषांनां संसार सुख मिळत आहे. प्रत्येकांत कोणत्याना कोणत्या कारणानें व तऱ्हेनें संसार सुखास मुकलेली स्त्री पुरुषे आहेत व त्यांचे हातून अयोग्य वर्तन घडत आहे. अशा स्थितींत पूर्वपरंपरेला धरून व समाधानाला जागा ठेऊन आचरतां येणारा मार्ग सोडून नवीन प्रघात पाडणेंत अर्थ काय? नवीन प्रघात पाडून सुद्धां जर इष्टफल प्राप्ती होत नाहीं तर मग त्या उठा ठेवीत मतलब काय! प्रत्येक समाजांत स्त्री पुरुष संख्या साधारणपणें सारखी आहे. त्यांत अविवाहित पुरुष राहिले कीं अविवाहित स्त्रिया रहाणारच. मग त्या कुमारिका अविवाहित राहिल्या काय किंवा विधवा विवाहित राहिल्या काय एकच नव्हे का! इतकी माणसे संसारसुखाला मुकून अयोग्य मार्गानें जाणेचा संभव दोहींपक्षी सारखाच आहे. शिवाय अविवाहित विधवानां एक समाधानाला जागा आहे ती अविवाहित कुमा. रिकानां नाहीं. आपले बापदादानी आपले लग्न करून दिले मग नवरा मेला त्याला कोण काय करणार असें म्हणून विधवांनां समाधान मानणेस जागा आहे पण कुमारिकांनां हें पण समाधान नाहीं. मग विधवा विवाह करून आगींतून निघून फुपाट्यांत पडण्यांत मतलब काय! विधवाविवाहा पेक्षां सतीची चाल सुरू केली तर हिंदू समाजाचे जास्त हित होणार आहे. व ती चाल पाडणेस सर्वांनी झटावें.

## प्रकरण चौथे

# निषेध.

---

धर्म शिक्षणाचा ओनामा पुस्तक चार यांत निषेधाबद्दल जें विवेचन केलें आहे ते स्त्रिया व पुरुष या दोघानांही सारखेच लागू आहे. या शिवाय स्त्रियासाठीं विशेष सांगावयाचे तें इतकेंच कीं स्त्रियांनी १ नटणें, २ मुरडणें, ३ निर्लज्जपणा व ४ हेकेखोरपणा हें चार गुण सोडावे.

१ **नटणें**—स्त्रियांनां स्वाभाविक सौंदर्याची इच्छा आहे व या सौंदर्यानेंच स्त्रिया पुरुषानां मोह पाडतात. समाजाचें प्राथमिक स्थितींत या सौंदर्यानें व नटण्यानें कदाचित फायदा झाला असेल पण ती अवस्था सोडून पुढें गेल्यावर, स्पर्धाही गोष्ट चांगली नाहीं असें ठरल्यावर मग स्त्रियांनी गैरवाजवी नटून व मुरडून पुरुषानां उन्मत्त करणें गैर होय, एका कविने म्हटल्या प्रमाणें

**या सांजघनावरणं परकौतुकवृद्धयेनतुत्रपया ॥**

ज्याचे ढुंगणाचे लुगडे लज्जाराखण्याकरतां नसून दुसऱ्यांचे लक्ष जास्त वेधावे म्हणून असते असले वर्तन स्त्रियांनी करूं नये. दारुचा गुत्ता पाहिला म्हणजे जसा दारुबाज बेहोष होऊन दारू पितो तसेच नटवी स्त्री पाहून कामी पुरुषाला होते व मग त्यापासून समाजांत अनेक बखेड होतात. असल्या बखेड्यानीच सर्व नाटके, कादंबऱ्या व मानवी इतिहास भरलेले आहेत.

२ **मुरडणें**—नटण्याला कांहीं विशिष्ट संपत्ती व ऐपत तरी लागते पण मुरडण्याला ती सुद्धां लागत नसल्यानें मुरडणे हें प्रत्येक स्त्रीला फार सुलभ साधन झालें आहे व त्यामुळें मुरडणारी स्त्री वाईट चालींची असा लोकांचा समज होतो यासाठीं लहानपणापासून मुरडण्याकडे प्रवृत्ति ठेऊं नये. पोषाक व वर्तन साधे ठेवावे साधेपणा हें भूषण आहे.

३ **निर्लज्जपणा**—निर्लज्जपणा म्हणजे विनय नसणे मुरडण्याला सुद्धां एक प्रकारचे कौशल्य किंवा कसब लागते. मुरडणे, हावभाव करणें ही एक कला आहे पण निर्लज्जपणाला त्याची पण जरूर नाहीं. एखादे शूर्पणखेला पण

प्रभूते म्हणे हे पहा अंग लोला ॥
व तो मी वरावे मला चांगलीला ॥

स्तवी दाखवी ती स्वये आस्य काय

असें करतां येते. स्त्रीयांचे शरीरच परमेश्वरानें नाना उंच सखल भाग ठेऊन मनोहर केले आहे व प्रत्येक स्त्रीनें हें उच सखल भाग जितके लपवितां येतील तितके लपवावे. निदान त्यांचे प्रदर्शन तरी मांडू नये. पाश्चात्य स्त्रियांचे या बाबींचे रिवाज आपणांस बिलकूल अनुकरणीय नाहींत रावणाची व सीतेची अशोक वनांत गांठ पडली असतां आपले सर्व अवयव लपवून गुडघ्यांत तोंड घालून सीता रावणाशी बोलली. स्त्रियांचे उन्नत स्तन वगैरे पाहून पुरुषाला जास्त मोह उत्पन्न होतो यासाठीं हें सर्व भाग योग्य रितीनें लपवावे. आपले पुढें या बाबद दोन नमुने आहेत. सर्व शरीराचें मोकळे प्रदर्शन करणारी पाश्चात्य चाल व सर्व शरीर अगदीं झांकून टाकणारी मुसलमानी चाल या दोन्ही चाली अगदीं दोन टोंकाच्या म्हणून त्याज्य पण त्यांत पहिलीपेक्षां आपला कल दुसरीकडे जास्त असावा हें इष्ट होय. वेश्या सारख्या स्त्रिया आपल्या रूपावरच पोट भरणाऱ्या असतात त्यांनी हा मार्ग पाहिजे तर पत्करावा पण कुलस्त्रियांनीं केव्हांही शरीराचे प्रदर्शन करूं नये. तो जितकें झाकतां येईल तितकें झांकावें कारण दुसऱ्यास मोह पाडणे हें त्यांस योग्य नव्हें.

निर्लज्जपणांत नुसते शरीराचे प्रदर्शनच येते असें नव्हे तर मर्यादा सोडून हंसणें, खेळणें, बोलणें, गाणे वगैरे गोष्टींचा पण अंतर्भाव होतो. पाश्चात्य स्त्रियांचे अनुकरण करण्याकडे हिंदी स्त्रियांची प्रवृत्ती वाढत आहे व पाश्चात्य स्त्रियांत हें दोष फार वाढले आहेत या साठीं याचा निषेध करणें भाग पडलें. नाहींतर आमच्या आर्यस्त्रिया विनय व मर्यादा या गुणाबद्दल फार प्रसिद्ध आहेत. युरोपियन तत्वज्ञ या गुणांबद्दल त्यांची

फार स्तुती करतात. पण तिकडे सगळ्यांचा स्वैर वर्तनाकडे कल होत चालला आहे. स्वातंत्र्य स्वातंत्र्य म्हणतां म्हणतां स्वातंत्र्य ह्मणजे ज्याला कशाचाहि आळा नाहीं असें वर्तन असा अर्थ होत चालला आहे. ही प्रवृत्ति समाजाचे स्थैर्याला घातक आहे ही गोष्ट सर्वजण जाणतात पण कोणत्याही एका अंगाकडे जग वळूं लागले म्हणजे ते त्या अंगाच्या अगदीं परा सीमेपर्यंत जाते व मग उलट खाते या नियमाला अनुसरून मर्यादा मर्यादा ह्मणतानां स्त्रियांनां अंधाऱ्या खोलींत नेहमीं पडद्यांत व कपड्यांत गुंडाळून ठेवणेकडे सीमा झाली तशी स्वातंत्र्य स्वातंत्र्य ह्मणतानां अगदीं जनावरांपलिकडे स्वैर आचाराकडे कल झुकत आहे. या दोन्ही टोंकाचें मधली स्थिती हीच उत्तम स्थिती होय व तीच आपल्या आर्य स्त्रियांचें ध्येय होय. आज अनेक युगे त्यांनी हें ध्येय सोडलें नाहीं पण " राजा कालस्य कारणं " या न्यायानें मुसलमानी अमलाबरोबर हिंदुस्थानांत पण गोषा आला व इंग्रजी अमलाबरोबर हिंदुस्थानांत स्वैर आचरण येत आहे व या साठीं आतांपासून आपणांस जपलें पाहिजे.

निषेधातील शेवटची गोष्ट ह्मणजे हेकेखोरपणा. हट्ट हा गुण चांगल्या पैकी आहे. तो ईश्वरप्राप्तीसारखे मोठे काम साधून देणारा आहे पण त्याचा दुरुपयोगच इतकें वेळां होतो कीं हा नसेल तर बरें असें म्हणण्याची पाळी येतें जगांत ज्ञानी माणसांपेक्षां अज्ञानी माणसेंच फार व यांच्या हातून या गुणांचा दुरुपयोगच फार होतो चौऱ्यायशीं लक्ष योनी फिरतांना प्रत्येक योनींत आपले व मुलाबाळांचें संरक्षणासाठीं कोमलपणा व अशक्तता यामुळें स्त्री जातीनें, शक्ति पुढें युक्तीचाच अवलंब केला आहे. या कारणामुळें अनेक जन्मांचें संस्कारामुळें ' अनृत साहसं माया " हें गुण त्यांचे अंगीं खिळून गेले आहेत. अशा स्थितींत स्त्रियांचे हट्ट असल्याच कोणत्यातरी कामीं वापरण्यांत येतात व ह्मणून येथें त्याचा निषेध केला आहे. हट्टाचा दुरुपयोग हा पुरुष व स्त्री या दोघांतही दोषास्पदच आहे पण अनेक जन्म संस्कारामुळें स्त्रियांत त्याचा दुरुपयोग

जास्त होतो म्हणून सुज्ञ स्त्रियांनी या गुणावर चांगली नजर ठेवावी इतकेंच सांगणें आहे. ज्यापासून या जन्मीच नव्हे तर जन्मांतरी सुद्धां हीतच होईल अशा बाबतींत हट्ट उत्तम. कोणी इसम मेला तर मरतानां त्याची जी वासना असेल त्या प्रमाणें त्याला दुसरा जन्म येतो यासाठीं चांगल्या गुणाबद्दल हट्ट धरला तर ते गुण या जन्मांत साधले तर उत्तमच पण ते गुण न साधता हट्टांत मरण आले तरी पुढील जन्मीं ते गुण साधतात. यासाठीं परमेश्वराचे दर्शन व्हावें असल्या गोष्टींत हट्ट धरावा. या हट्टानें या जन्मी नाहींतर दुसऱ्या जन्मी तरी ईश्वर दर्शन खास होईल. स्वराज्य मिळविणें साठीं आपल्या देशाचे कल्याणासाठीं हट्ट धरून मरणे याच प्रमाणें हितकर आहे. धारातीर्थी देह ठेवणें श्रेयस्कर याच कारणासाठीं आहे. पण पैशासाठीं, घरासाठीं, खाण्यासाठीं हट्ट धरून मरण्यानें पुढील जन्मी या गोष्टी आपणांस मिळतील खऱ्या पण त्या खरोखर इष्ट नाहींत. त्या शाश्वत नाहींत, त्या अत्यंत कल्याण करणाऱ्या नाहींत यासाठीं असल्या गोष्टीसाठीं हट्ट धरूं नये. ईश्वर प्रसन्न झाला तर आपण काय मागावें हें पाहून त्या गोष्टीसाठीं हट्ट धरणेस हरकत नाहीं. परमेश्वर प्रसन्न झाला तर आपण कांहीं मला खायला दे, प्यायला दे, ल्यायला दे, दवाखाने दे, शाळा दे, असें मागणार नाहीं. माझे कल्याण कर, जगाचें कल्याण कर असें मागू म्हणून या दुसऱ्या गोष्टींसाठीं हट्ट धरावा पहिल्यासाठीं धरूं नये.

---

## प्रकरण पांचवें.

# सच्छास्त्र श्रवण.

---

सच्छास्त्र श्रवणांतील भजन, कथा, कीर्तन वगैरेचें विवेचन धर्म शिक्षणाचा ओनामा पुस्तक पांचमध्यें केलें आहे ते स्त्री व पुरुष या दोघांस सारखेंच उपयुक्त आहे म्हणून येथें त्याचा नुसतां उल्लेख केला आहे. फक्त स्त्रियासाठीं विशेष सांगणें तेच येथें सांगत आहे. मानसीक उन्नतीच्या दृष्टीनें माणसांचें चार वर्ग पडतात [१] चंचल किंवा खटपटी [२] प्रेमी, [३] विचारी व (४) ज्ञानी. हे ते चार वर्ग होत. एकंदर मनुष्य जाति या चार वर्गांत विभागली गेली आहे इतकेंच नव्हे तर प्रत्येक मनुष्य आपल्या एका जन्मांत या चार अवस्थातून जातो. लहानपणी पंधरा वीस वर्षें वय होई पर्यंत मनुष्य साधारणपणे चंचळ किंवा खटपटी असतो. कोणताही विचार मनांत आला की त्याप्रमाणें कामास लागणेकडे त्याची प्रवृति असते. उगीच स्वस्थ बसणे त्याला आवडत नाहीं पुढें सरासरी चाळीस वर्षांपर्यंत मनुष्य प्रेमी असतो. त्याचे आपले स्वतःवर, आपल्या कुटुंबावर आपल्या देशावर फार प्रेम असते व त्या प्रेमासाठीं लागेल तो स्वार्थत्याग करण्यास त्याची तयारी असते. पुढें वयाचे पंचावन्न वर्षांपर्यंत तो विचारी असतो. तारुण्यातील त्याची धुमाडी ओसरलेली असते. कोंण. तेही काम करणें तर ते विचारानें धिमेपणानें करावे असें त्यास वाटते. यानंतरचे त्याचे वयांत त्याला कशांतच अर्थ वाटत नाहीसा होऊन केवळ शांती हेच त्याचे ध्येय होते. याप्रमाणें जगांत चार प्रकारची माणसे आहेत व त्यांना ईश्वरी लाभ होणेसाठीं शास्त्रकारांनी चार मार्ग सांगितलें आहेत. चंचल किंवा खटपटी माणसांसाठीं कर्ममार्ग, प्रेमी माणसांसाठीं भक्तिमार्ग, विचारी माणसांसाठीं योगमार्ग व ज्ञानी माणसांसाठीं ध्यानमार्ग. इतर धर्मांत नसलेली हिंदु धर्मांतील मोठी विशेष गोष्ट म्हणजे ही कीं माणसांचे प्रकृतीभेद ओळखून त्यांनां अनुरूप असें उपासनेचे मार्ग यांत

आहेत. इतर धर्मांत सगळ्यांना एकच पद्धत सांगितलेली आहे तसे हिंदु धर्मांत नाहीं.

**कर्ममार्ग**—कर्ममार्गाचे मुख्य तत्व ह्मणजे "यथादेहे तथादेवे" हे आहे. आपल्या स्वतःच्या देहाला ज्या प्रकारचें भोग वगैरे आवडतात तसेंच परमात्म्याला अर्पण करावयाचे हा त्यांचा नियम, आपल्या वरून आपण जग ओळखतो व परमात्म्याला ओळखण्याचा पण हाच मार्ग. परमेश्वराचे अस्तित्व पण आपण असेंच आपल्या-वरून ओळखतो. आपण कोणतेही व कसलेही यंत्र केलें तरी त्याला चालविण्याला मनुष्य लागतो हें पाहूनच ईश्वर पण सर्व भूतांमध्यें असून त्यांचे व्यवहार चालवितो असें आपण म्हणतो. आपल्यांत व्यवस्था म्हटली म्हणजे तिला कोणी तरी नियामक लागतो व त्यानें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें ती व्यवस्था असते असें पाहूनच आपण सृष्टीला नियामक परमात्मा असें म्हणतो व सृष्टीचें नियम परमात्म्यानें घालून दिलेले आहेत व त्या प्रमाणें सृष्टी चालते असें समजतो, आपली स्तुती, आपली बरदास्त, आपल्याला दान या गोष्टी आपणांस आवडतात व या करणारांनां आपण त्यांचे वांछितार्थ देतो तसाच परमात्मा प्रार्थना, माफी मागणें, पूजा वगैरेनीं संतुष्ट होऊन आपणांस पाहिजे ते देईल असें समजतो व त्या प्रमाणें आपले सर्व व्यव-हार चालतात. ईश्वराचे भजन, पूजन वगैरेतील रहस्य हे आहे. ज्या ज्या माणसांनां ईश्वर आपल्या सारखा आहे असें वाटतें त्यांनी याप्रमाणें त्याचीं षोडशोपचार पूजा करावी व मग प्रसन्न होऊन पूजकांनां तो इष्ट वस्तु देतो. परमेश्वराचे आपल्यावर अनंत उपकार झालें आहेत हें जाणून त्याचे उपकारच अंशतः उतराई होणेसाठीं कांहीं स्वार्थत्याग करणे हें सर्व यज्ञाचे रहस्य आहे व सर्व कर्ममार्ग या धोरणानेच रचलेला आहें व त्या प्रमाणें यथाशक्ति प्रत्येकानें करावे.

देवपूजेंत पहिल्यानें शंख व घंटा यांची पूजा असते. शंख हा लांबचे लोकांनां देवपूजेचे आमंत्रण देणेसाठीं व घंटा जवळचे लोकांनां आमंत्रण देणेसाठीं उपयोगी असते. त्यानंतर सर्व जगभर ओतप्रोत भरलेल्या परमात्म्याला आपल्या बुद्धिला ग्राह्य असें मूर्तस्वरूप घेणेस लावणे याचे नांव 'आवाहन' आवाहन ह्मणजे आणविणे वाहन पाठवून आणविणे. जसा जगभर पसरलेला सूर्य प्रकाश आपणांस सोसत नाहीं ह्मणून आपण घर बांधून त्यांत आपल्या कामापुरतांच उजेड घेतो तसेच सर्वव्यापी परमात्म्याचे स्वरूपानें आपणांस त्याची सेवा करतां येत नाहीं व व्यवहाराला अडचण येते ह्मणून इतरत्र असलेले त्याचे स्वरूप दृष्टआड करून आपण फक्त मूर्तींत मात्र त्याचे स्वरूप पहातो हें त्याचे आवाहन. मग परमात्मा आल्यावर त्याला पाय धुणेस पाणी देणे,. तोंड धुणेस पाणी देणे बसण्यास बसकर देणे याचे नांव 'पाद्य' अर्घ्य व 'आसन. त्यानंतर परमात्म्याला आंघोळ घालणे ह्मणजे 'स्नान' कोरडे वस्त्र नेसणेंस व पांघरणेस देणें ह्मणजे वस्त्र व उपवस्त्र. गंध लावणें, फुल वाहणें, दिवा ओवाळणे, जेवायला घालणें, विडा वगैरे मुखशुद्धि देणे, नानाप्रकारची फळें खाणेस देणे, नमस्कार घालणें, प्रदक्षणा घालणें, प्रार्थना करणें व जाणेस परवानगी देणें अशी परमेश्वराची पूजा असते. परमेश्वराचे पूजेंत त्यालीं उपचार कसेही दिले तरी तो स्थीर व शांत असतो ही गोष्ट नेहमीं पहावयाची असते. देवाला दूध, दही, तूप, साखर, मध, अत्तर, उन्ह-पाणी, थंड पाणी वगैरे कशानेंही आंघोळ घातली तरी त्याचे हंसण्यांत किंवा ठेवणींत फेरफार पडत नाहीं व हेंच आपलें ध्येय आपण ठेंवलें पाहिजे. सुख येवो व दुःख येवो परिस्थिती कशीही बदलो आपण शांत व स्थीर रहाणेस शिकणें हें पूजेचे साध्य होय. 'हरिंभूत्वा हरिंयजेत्' म्हणून शास्त्र ह्मणते याचा अर्थ हरीची पूजा करतां करतां आपण स्वतः हरीच होऊन जावे हें पूजेचें ध्येय होय.

देवाची पूजा आपण आपल्या मनाप्रमाणें किंवा ऐपती प्रमाणें करतो व उपचारांत कमी जास्त झालें तर देव कुरकुरत नाहीं पण या मुळें आपणांस सेवा करणेचें काम नीट करण्याची संवय लागत नाहीं हा त्यांत दोष रहातो व हा दोष घालविणेंसाठीं शास्त्रकार गुरुसेवेचे महत्व सांगतात. मूर्तीला निश्चल व स्थीर रहाणें सहज आहे पण आपल्या सारख्या विकारी माणसाला पण निश्चल व शांत कसें रहतां येते हें आपण सत्गुरुपासून शिकावयाचें व हें शिकण्यासाठीं त्यांचे जवळ राहून त्यांची एकनिष्ठपणें सेवा करावयाची. देवाला आपण पाणी घालतानां ते जास्त किंवा कमी उन्ह असले तर चालेत पण मनुष्य गुरुला तें योग्य तितकेंच उन्ह असले पाहिजे. देवाचें जेवण खारट, तिखट वगैरे झालें तरी चालेत पण गुरुला तसें चालणार नाहीं हें जाणून काळजीपूर्वक सेवा करणेस शिकणें व याप्रमाणें काळजीपूर्वक सेवा करतां करतां ज्ञान प्राप्ती होऊन परमात्मस्वरूपाचे आपणांस ज्ञान होते हा गुरुसेवेपासून फायदा आहे. सत्गुरु आपणांस परमात्म्याचे दर्शन करवितात व हा अलभ्य लाभ करून देणाराचे उतराई होण्यास वाटेल ती जिन्नस देणेस आपण तयार असले पाहिजे. अशी सेवा स्त्रियांनां एका नवऱ्याशिवाय इतर पुरुषांची करतां येणे शक्य नाहीं म्हणून बायकांनी पतिशिवाय दुसरा पुरुष गुरू करूं नये असें शास्त्र सांगते इतकेंच नव्हे तर नवऱ्याचीच एकनिष्ठपणे सत्गुरु प्रमाणें सेवा केली तर सत्गुरुपासून जो लाभ व्हायचा तो नवऱ्यापासून पण होईल असें शास्त्र सांगते. एकलव्याला मातीचे गुरुपासून जर द्रोण गुरु इतका लाभ झाला तर सज्ञान नवऱ्यापासून ईश्वरी साक्षात्कार कां होणार नाहीं. प्राचीनकाळीं सीता, मंदोदरी, मैत्रेयी गार्गी याना असा लाभ झाला आहे. तात्पर्य देवपूजा व गुरु सेवेपासून मनुष्य साक्षेपी होतो व शेवटीं त्यास परमपद मिळते.

**भक्तिमार्ग**—भक्तिमार्गाचें मुख्य ब्रीद म्हणजे "भक्तिः परमप्रेम स्वरूपा" असें आहे. आपणांस अत्यंत आवडती वस्तु ह्मणजे परमात्मा. पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व मन अशा अकरापैकी प्रत्येकाचे मार्फत आपणांस अत्यंत आवड असणें शक्य आहे म्हणून त्या त्या साधकावरून भक्तिचे अकरा प्रकार झाले आहेत. भक्तीचा कोणताही प्रकार घेतला तरी त्यांत मन इतकें रंगून जावें कीं आपलें स्वतःचा पण त्यांत विसर पडावा म्हणजे ती पक्क झाली. त्या एका गोष्टी वांचून दुसरी गोष्ट भक्ताला सुचुं नये. ऐकण्याचा नाद असला तर ती श्रवण भक्ती झाली. गाण्याचा नाद असला तर ती कीर्तन भक्ती झाली. नाद कोणता कां असेना पण तो परमात्म्याचा नाद रात्रंदिवस सारखा लागला पाहिजे. काम, क्रोध वगैरे षड्रीपु पण ते सुद्धां जर एकट्या परमात्म्याकडेच लागले तर ते मोक्षाला साधनभूत आहेत. असें भक्तिशास्त्र सांगतें. अशा तऱ्हेची भक्ति लागायला इतर गोष्टींची गोडी सुटली पाहिजे. साधारण संसारी माणसाचें प्रेम दहा ठिकाणीं वाटलेलें असतें. थोडें स्वतःचे शरीरावर, थोडें कुटुंबावर, थोडें मुलावर, थोडें धनावर, थोडें जनावरावर, थोडें देशावर, थोडें कीर्तिवर असें त्याचे अनंत भाग होतात व त्यामुळें त्याची शक्ति नाहींशी होते. एका मानवी शरीरातील शक्ति परिमित आहे व ती अशी हजार ठिकाणीं वाटली गेली ह्मणजे तिचा प्रभाव दिसत नाहीं. आंधळ्या माणसाची शक्ति डोळ्यांत खर्च होत नाहीं म्हणून ती वांचलेली शक्ति इतर इंद्रियांत थोडथोडी जास्त दृष्टोत्पत्तीस येते. इंद्रियें विकल झाली असतां त्यांची वांचलेली शक्ति इतर इंद्रियांत वाटून गेलेली आपण पहातो व यावरून सगळ्या इंद्रियांतून खर्च होणारी शक्ति जर आपण एकत्र केली व ती एकाच इंद्रियाकडे

लावली तर ती परमात्मस्वरूप आपणांस दाखवूं शकेल नव्हे दाखविते असे भक्तिशास्त्र सांगते. या प्रमाणें शक्तीचा व्यय बंद होऊन तिचे एकीकरण व्हावे ह्मणून विषयत्याग व संगत्याग अशी दोन साधने भक्तिशास्त्रानें सांगितली आहेत. विषयत्याग म्हणजे स्थूल किंवा शारीरभोग व संगत्याग ह्मणजे सूक्ष्म किंवा मानसभोग हे दोन्ही सुटतील तर उत्तम पण इतके न होईल तर निदान संग तरी टाकला पाहिजे असे भक्तिशास्त्र म्हणते. संग असला तर यथाकाल, यथावकाश मनुष्य शेवटीं सर्व पायऱ्या गडगडत खालीं येईल असें गीता सांगते.

ध्यायतो विषयान्पुंसां संगस्तेषु प्रजायते ॥
संघात्संजायतेकामः कामात्क्रोधो भिजायते ॥ १ ॥
क्रोधाद्भवतिसमोहः संमोहात्स्मृति विभ्रमः ॥
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ २ ॥

अशी ही संगापासून अनर्थ परंपरा उत्पन्न होते व शेवटीं माणसांचा नाश होतो. या करतां संग निदान टाकलाच पाहिजे. याप्रमाणें सर्व विषयांचा संग टाकून सर्वात्मना एकट्या परमात्म्या कडे लक्ष लावले ह्मणजे परमात्मा जवळ आहे. जवळ कसला तो आपल्या हृदयांतच आहे नव्हे आपणच तो आहो असा अनुभव भक्ताला येतो. तुकारामादि अनेक भक्तांनी " तुका झाला पांडुरंग " अशा शब्दांत हा आपला अनुभव स्पष्टपणें सांगितला आहे. ज्या प्रमाणें पूजा करतां करतां पूजकच पूज्य स्वरूप होतो तसेंच भक्ति करतां करतां शेवटीं भक्तच भगवान् होतो व या प्रमाणें कर्ममार्गानें जो लाभ मिळता तोच भक्ति मार्गानें मिळतो. कर्ममार्गात खटपट फार असून अभिमान उत्पन्न होण्याचें भय असते तसें भक्तीत नसते. कर्ममार्गी साक्षेपी होतो तर भक्तिमार्गी लीन होतो. भक्तींत अभिमान जातो.

**योगमार्ग**—इतर ठिकाणीं खर्च होणारी मनाची शक्ती जर सांठवून एकाच ठिकाणी लावली तर ती फार काम करते याच अनुभवाचा फायदा घेऊन भक्तीचें अक्रा प्रकारापैकीं दहा सोडून देऊन सर्व शक्ति एकाच्या मनाच्या किंवा चित्ताच्या ठिकाणीं एकवटणे याचें नांव योग. "योगश्चित्तवृत्तिनिरोधः" चित्ताची हालचाल बंद करणें याचे नांव योग. परमप्रेम दाख. विणेस पांच कर्मेंद्रिये, पांच ज्ञानेंद्रिये व मन अशा अक्रा साधनामुळें ज्या प्रमाणें भक्तीचें अक्रा प्रकार होतात त्याच प्रमाणें चित्ताची एकाग्रता साधण्याचें साधनावरून योगाचे आठ प्रकार होतात. चित्ताची एकाग्रता करण्यास आपण बसलों म्हणजे पहिल्यानें शरीराची हालचाल बंद करावी लागते. शरीर हालत असतानां मन निश्चल रहात नाहीं हा अनुभव आला म्हणजे योगाचें पहिलें अंग जे आसन त्याची किंमत समजते. शरीर स्थीर व सुखानें ठवणें याचे नांव आसन. शरीर निश्चल ठेवलें तरी प्राणांचे आंत बाहेर जाण्यायेण्यानें मन चंचल होते असा अनुभव येतो व मग प्राणायामास सुरवात होते. प्राण ही जाणेयेणे बंद केलें तरी मनाची चळवळ बंद होत नाहींच व म्हणून कोणत्यातरी एकाच वस्तुचे ठिकाणीं मन ठेवावे लागते याला धारणा म्हणतात. "देशबंधश्चित्तस्यधारणा" चित्त एकाच ठिकाणीं ठेवणें याचें नांव धारणा. पुढें हा देश किंवा हें लहान लहान करीत जाऊन शेवटीं अगदीं एका बिंदूत किंवा शून्यांत चित्ताचा लय करणे म्हणजे योग साधला. शरीर निश्चल, प्राण निश्चल, मन निश्चल अशा पायऱ्यानीं योग साधन होत असते.

वर सांगितलेला धारणेचा मार्ग कष्टसाध्य आहे व यासाठीं योगशास्त्रांत चित्त एकाग्र करणेचे दुसरें मार्ग सांगितले आहेत तें खालीं लिहिलें प्रमाणें.

१ **अभ्यासवैराग्याभ्यां**—एका वस्तूचें ठिकाणीं चित्त ठेवून इतर ठिकाणाहून तें काढून घेतल्यानें.

२ **ईश्वरप्रणिधानाद्वा**—कर्ता करविता सर्व ईश्वर आहे असें जाणून स्वस्थ राहिल्यानें.

३ **प्रच्छर्दनाविधारणाभ्यावाप्राणस्य**—प्राणायाम करून ह्मणजे श्वासोश्वास बंद करून वर सांगितल्या प्रमाणें.

४ **विषयवती वा प्रवृत्तिः**—आपणाला जो विषय आवडत असेल त्या आवडीचें स्मरण ठेवल्यानें

५ **विशोका वा ज्योतिष्मती**—एखाद्या तेजाचें ठिकाणीं नेत्र स्थीर ठेवून तेथेच चित्त ठेवल्यानें,

६ **वितराग विषयंवा चित्तं**—चित्तातील सर्वविषय घालवून देऊन चित्त निर्विषय केल्यानें.

७ **निद्राज्ञानावलंबनंवा**—स्वप्नांत व नंतर झोंपेंत असतांना आपणांस कसे वाटते याचा विचार केल्यानें किंवा

८ **स्वप्नज्ञानावलंबनं**—हें सगळे जग हे मोठे स्वप्नच आहे असें ध्यानयोग जाणल्यानें.

९ **यथाभिमतध्यानाद्वा**—आपल्याला आवडत असेल अशा प्रकारच्या ध्यानाने.

आपल्या हृदयांत एक कमळ असून त्या कमलांत नीवारधान्याचे कणसा प्रमाणें पिवळीधमक व तेजःपुंज अग्नीची ज्योत आहे व त्या ज्योतीत परमात्मा आहे असें ध्यान करावें असा ध्यानाचा प्रकार शास्त्रकारांनी सांगितला आहे या प्रमाणें कर्माचा विचार करतां करतां भक्ति, भक्तिचा विचार करतां करतां योग, व योगाचा विचार करतां करतां ध्यान या मार्गाकडे आपण येतो. वास्तविक पाहिलें तर हें मार्ग कांहीं भिन्नभिन्न नाहींत.

सगळे एकाच मार्गाचे टप्पे आहेत. जगाचे सर्व विभागाप्रमाणें हें पण काल्पनीक विभाग आहेत. काल, स्थल, वगैरेचे विभाग जसें काल्पनीक असतात तसेंच हें परमार्थ मार्गाचे विभाग काल्पनीक आहेत. हें व्यवहाराचे सोईसाठीं आहेत.

जगांतील कोणतीही एकच वस्तु एकाच माणसाला भिन्नभिन्न इंद्रिया मार्फत भिन्नभिन्न प्रकारें अनुभवास येते त्याच प्रमाणें एकच परमात्मा एकाच इसमाला भिन्नभिन्न मार्गानें गेल्यामुळें भिन्नभिन्न असा अनुभवांत येतो. जसें आंब्याचें फळ आपण डोळ्यांनीं पाहिले ह्मणजे ते हिरवे दिसते. डोळ्यांनां फक्त रंगाचेंच ज्ञान होते यामुळें ते रंग तेवढा सांगतात. त्या फळाला हात लावला ह्मणजे ते गार लागते, मऊ लागते. स्पर्शेंद्रियाला त्याची उष्णता व खरबरीतपणा मात्र समजतो व तितकेंच ज्ञान ते देते. नाकाला त्या आंब्याचा वास समजतो व तितकेंच ज्ञान ते देते. रुचिला त्याचा स्वाद समजतो व तितकेंच ज्ञान तिला देतां येते. या प्रमाणें एका आंब्याचें निरनिराळे तपासणाराचें सहाय्यानें आपणांस निरनिराळे अनुभव येतात. खरें पाहिलें तर अनुभव एकच पण निरनिराळ्या भाषेंत त्यांनां निरनिराळीं नांवे आहेत. प्रत्येक इंद्रियाची भाषा निराळी व त्यामुळें तें आपलें ज्ञान त्या भाषेंत सांगते. घोडा एकच असतांनां निरनिराळे लोक जसे त्याला निरनिराळी नांवे निरनिराळे भाषेमुळें देतात तीच गोष्ट परमेश्वराची होय. पूजक ज्याला पुज्य ह्मणतो त्यालाच भक्त भगवान् म्हणतो, त्यालाच योगी ईश्वर म्हणतो व त्यालाच ध्याता ध्येय ह्मणतो. या प्रमाणें एकाच वस्तुला परिस्थिती भेदाने निरनिराळी नांवे आहेत, किंवा भाषा भेदानें निरनिराळे शद्ब आहेत. शहाणे लोक हे जाणतात व त्यामुळें तें अमका मार्ग श्रेष्ठ व तमका कनिष्ठ म्हणत नाहींत. कर्ममार्गानें मनुष्य साक्षेपी होतो, भक्तिमार्गानें भक्तलीन होतो, योगमार्गानें मनुष्य विचारी होतो व ध्यानमार्गानें तो शांत होतो. आपणाला कोणचा

गुण साध्य आहे, सुलभ आहे पटतो हें पाहून ज्यानें त्यानें आपआपल्या योग्यते प्रमाणें एका मार्गाचें अवलंबन करावें व मग तो सोडूं नये. दहा ठिकाणीं चार चार हात विहीरीं खोदण्यापेक्षां, एकाच ठिकाणीं चाळीस हात विहीर खोदली तर पाणी लागणेचा जास्त संभव आहे. तसेंच दहा मार्गानीं थोडथोडे भगवंताचे आराधन करणेपेक्षां एकाच मार्गानें एकनिष्ठ-पणें सेवा करणें अधिक श्रेयस्कर होय. क्रिया पूजा, जप, प्रदक्षणा, पुराण कथा, कीर्तन वगैरे अनेक मार्गाचें साधन करतात पण त्यांनीं तसें न करतां कोणता तरी एक मार्ग स्वीकारावा व तो नित्य नेमानें शेवटपर्यंत चालवावा. जरी पहिल्यानें मन एका ठिकाणीं लागणेस शोडशोपचार पुजा अवश्य आहे तरी जसजसी प्रगती होईल तसतसे मनाला एकाग्र करणेंसाठीं साधनें कमी करीत जावी. जितका पसारा जास्त तितके मन एकाग्र होणे कठीण म्हणून एकदा मनाला गोडी लागली ह्मणजे त्याला कोणचा तरी एकच मार्ग घेऊं द्यावा. देवाची गार्गी म्हणणे हें एक या कामी चांगले साधन आहे. मुलाबाळांचें मन रंजन करून, त्यांना गप्प करून ईश्वराकडे मन लावणेस हें साधन बरें आहे. इतर साधनांत मुलांचा व्यत्यय येण्याचा संभव असतो तसा या साधनांत नसतो पण याला स्वभाविक गोड गळा व प्रेमळ वृत्ती असावी लागते. लहानपणा-पासून वृत्ती ईश्वरनिष्ठ असली म्हणजे जसजसें मोठें होत जावे तसतसे ईश्वराकडे मन साहजीक लागूं लागते रोजच्या व्यवहारांत सुद्धां ईश्वराचें आस्तित्व दाखविणाऱ्या कित्येक गोष्टी आपल्या प्रत्ययास येतात व असें झालें ह्मणजे मन ईश्वरी प्रेमानें भरून येते व मग तेथेंच रमते. याप्रमाणें एकदा ईश्वरीलीलांत मन रमूं लागलें ह्मणजे तें शेवटीं ईश्वर स्वरूपच बनते. ईश्वर जरूर ती साधनें भक्ताला आपोआप पुरवितो आपण नित्य नेमानें त्याचे स्मरण करीत राहिलें म्हणजे योग्य वेळीं योग्य ती साधनें व प्रसंग आपणांस आपोआप ईश्वरीकृपेने मिळतात. कित्येक वेळा आपण अगदी निराश होण्याचा प्रसंग यावा तोंच एकदम ईश्वर थोडेसे

प्रोत्साहन देणारें प्रसंग आणतो व त्यानें फिरून त्याचेकडे आपलें मन उत्साहानें लागते. ईश्वर भक्ताची उपेक्षा केव्हांही करीत नाहीं हे लक्षांत ठेवून उपासकानें दृढनिश्चयाने भक्ती करीतच रहावें म्हणजे अखेर त्याची इच्छा तृप्त होईल.

## प्रकरण सहावे

# व्रते वगैरे

---

व्रते प्रायश्चित्त, तप वगैरेबद्दल सामान्य माहिती धर्मशिक्षणाचा ओनामा पुस्तक सहामध्यें दिलीच आहे. येथें फक्त स्त्रियानांच उपयोगी अशी विशेष माहिती द्यावयाची आहे. व्रते वगैरे ही आपलें दोष घालविण्यासाठीं आहेत, आपलें शरीर आपण जें अन्न वगैरे घेतो त्याचे बनते यासाठीं अन्न, पाणी, व हवा जर आपण शोधपूर्वक घेऊं लागलो तर आपणांस शरीर व मन वाटेल तसें बनवितां येईल व याच तत्वावर निरनिराळे दोष घालविणेसाठीं निरनिराळी व्रते सांगितली आहेत. पाहिल्यानें कांहीं तरी नियम पाळण्याचीं संवय लागावी म्हणून तिथिपालन व्रत सांगितले आहे. तामसगुण जावे म्हणून हविष्यान्न सांगितलें आहे, सुस्ती जावी म्हणून धारणा पारणा व्रत सांगितलें आहे. पापाकडे असलेली प्रवृत्ती नाहीशी व्हावी ह्मणून चांद्रायण सांगितलें आहे. हविष्यान्न म्हणजे यज्ञांत होमाचे उपयोगी जें पदार्थ तितकेंच खाणें, तूप, दूध-तांदूळ व गहूं ही चार मुख्य हविष्ये आहेत. या चार जिनसांतच हविष्यान्न खाणारांने निर्वाह करावा. तोंडाचें कोड पुरविणेंसाठीं सैंधव सुद्धां हविष्यांत मोजतात. एक दिवस उपवास व दुसरें दिवशीं एक वेळ भोजन या नियमाला धारणा पारणा म्हणतात. तीन दिवस सारखे उपवास करणें ह्मणंज त्रिरात्रव्रत म्हणतात. चंद्र वाढेल तसा आहार वाढविणें व चंद्र क्षय होईल तसा आहार कमी करणें याला चांद्रायण म्हणतात. चांद्रा-

यणांत दोन प्रकार आहेत. दोन्ही बाजूस बारीक असून मधें फुगलेले ते यवमध्य चांद्रायण व दोन्ही बाजूस जाड असून मधे बारीक ते पिपीलीकामध्य चांद्रायण अमावास्येला उपवास करून मग रोज घांसघांस आहार वाढवीत जाणे व पौर्णिमे नंतर रोज घांसघांस आहार कमी करीत जाणे याला यवमध्य चांद्रायण म्हणतात. हें चांद्रायण पौर्णिमेस फुगलेले असते. पौर्णिमेस सुरूं करून रोज घांसघांस अन्न कमी करीत अमावास्येस उपवास व मग घांसघांस आहार वाढविणें हें पिपीलीकामध्य चांद्रायण यांत मध्यें उपवास येतो ह्मणजे मधे बारीक असते. अशा प्रकारची जेवणाची व्रते असतात.

कांहीं व्रते सेवाव्रते असतात, रोज एक घागर पाणी कोणाचें घरीं घालणें व गाईस वैरण घालणें याला चारापाणी म्हणतात. कोणाला रोज अन्न देणें याला शिदोरी म्हणतात, झाडाला रोज पाणी घालणें याला जलसेचन म्हणतात, गाईची सेवा सावली प्रमाणें करणें याला गोछायाव्रत म्हणतात, कोणीही आतिथी येईल त्याला तो मागेल ते खायला देणें याला इच्छाभोजन म्हणतात, कोणीही जेवायला आला तर त्याला नाहीं न ह्मणणे याला मुक्तद्वार म्हणतात, वाटेवर निर्जलस्थळीं पाणी पिणेची सोय करणें याला पाणपोई म्हणतात, विसाव्याचें जागी रस्त्यावर उतरणेंस जागा करणे याला धर्मशाळा ह्मणतात, रस्त्यांवर वाटसरूस सावली करणें ह्मणजे वृक्षच्छाया ह्मणतात. नद्यांवर धुणे वगैरे साठीं पायऱ्या करणे यास घांट ह्मणतात. देवाचे उत्सवासाठीं घर बांधणें यास देवालय बांधणे म्हणतात. देवांचे उत्सवांत नानाप्रकारची सेवा करणेची अनेक व्रते आहेत. कोणीं वाटसरू रस्त्यानें जात असेल तर त्याचे पाय चेपणें याला पादसेवा ह्मणतात. गरीब बाळंतीणीचे बाळंतपण करणें गरीबासाठीं दळण दळणें, सूत काढणें, कपड शिवणें, कापड विणणें वगैरे अनेक प्रकारें दुसऱ्याच्या उपयोगी पडण्याची सवय लावून घेणें याला सेवाव्रते म्हणतात. आजारी माणसाची शुश्रुषा करणें, त्यांना फुकट औषधोपचार करणें, मुलांना

फुकट शिकविणें, वगैरे अनेक प्रकारानें लोकांचे उपयोगी पडण्याची व्रतें बायकांनी करावी बायकांनां संसाराचें काम करून रिकामा वेळ सांपडतो व रिकामा वेळ परोपकाराकडे खर्च करणेची त्यांनी संवय लावून घेतली तर ते फार उत्तम आहे. शरीराला लोकाचे उपयोगी पाडणेंत झिजविणें हें मोठे उत्तम तप आहे. तप ह्मणजे शरीराला कष्टविणें व हें कष्टविणें जर लोकांचे हित करणे साठीं असेल तर ते सार्थकीच लागले म्हणावयाचे. आपण घरचे माणसांसाठीं आपल्या स्वार्थासाठीं अनेक कष्ट सोसतो पण ते स्वार्थप्रेरित असल्यानें त्यांची किंमत कमी लोकांचे कल्याणासाठीं जे कष्ट आपण सोसावे तेच कष्ट खरोखर सार्थकी लागले.

सर्व व्रतांत एकनिष्ठपणें पतिची सेवा करणे हें स्त्रियांचे फार मोठें व्रत आहे. हें व्रत जितके वाटते तितके सोपे नाहीं. सगळ्याच बायका हें व्रत करतात असें एकदम वाटेल पण बारीक विचार केला असत एखादीचेच हातून हें व्रत पार पडल्याचे दिसेल. आपल्याला आवडेल तेव्हां आवडेल त्या रितीनें नवऱ्याची सेवा करणे यांत कांहींच मोठेपणा नाहीं कारण हें काम आपली हौस पुरविण्यासाठीं आपण करीत असतो. आपल्याला कंटाळा आल्यावेळीं आपल्याला आवडत नाहीं अशा प्रकारची सेवा करणें हीच खरी सेवा करणे होय. तथापि ही सुद्धां सेवा लोभानें किंवा भयानें करणे यांतही मोठेपण नाहीं अमुक एक गोष्ट आपण केली नाहीं तर आपणांस शिक्षा होईल अगर आपले नुकसान होईल म्हणून करणें ह्मणजे पण एक प्रकारचा स्वार्थच आहे. अशी सेवा नोकर लोक पुष्कळ वेळा करीत असतात, पण आपल्याला कंटाळा आल्या वेळीं आपणांस न आवडणारे काम आपल्या माणसाचें सुख साठीं, प्रेमासाठीं, आवडीनें करणें कुरकुर न करतां, त्रास न मानतां करणे ह्मणजेच खरी सेवा होय, आपल्याला हौस म्हणून नव्हे, पति रागावतील ह्मणून नव्हे, पति कांहीं तर देतील ह्मणून नव्हे, तर केवळ पतिला आनंद होईल, बरें वाटेल, त्याचे कष्ट कमी होतील म्हणून कंटाळा न येतां सर्वदा त्याचे

सेवेस तत्पर असणे याचे नांव पतिसेवा. अशी पतिसेवा करणारी माउली फार दुर्मिळ. कंटाळणें, त्रासणें, कुरकुरणें हा मनुष्य स्वभाव आहे व याच्या पलिकडे गेलेली माणसे देवच झाली. ती माणसे माणसांचे पेक्षा फार श्रेष्ठ होत व या प्रमाणें श्रेष्ठत्व पावलेली जी स्त्री ती सती. आपल्याला त्रास झाला तरी तो त्रास न समजणे ज्यांची आपण सेवा करतो त्यांच्या सुखाकडे मात्र नजर ठेवणें व त्या शिवाय इतर गोष्टी मुळी लक्षांतच न येणे हे उत्तम व लक्षांत आले तर त्याकडे दुर्लक्ष करणें हे मध्यम. अशा प्रकारें पतिसेवेचे उत्तम व मध्यम असें दोन वर्ग करतां येतात व याच सेवेला निष्काम सेवा म्हणावयाचे.

## प्रकरण सातवे

# तीर्थयात्रा.



तीर्थयात्रा वगैरेबद्दलची माहिती धर्म शिक्षणाचा ओनामा पुस्तक सातमध्यें आली आहे ती दोघांही स्त्री पुरुषांना साधारण आहे. या भागांत तीर्थयात्रेत स्त्रियांचा विशेष तेवढाच सांगावयाचा आहे. सर्व तीर्थांचे ठिकाणी स्त्री व पुरुष याचे कर्तव्य सारखेच असते. पुरुषांनां मिशा असून पराक्रमाची घमेंड असते म्हणून त्यांना क्षौर आहे ते स्त्रियाना नाहीं. फक्त प्रयाग येथें गंगा व यमुनेच्या संगमावर स्त्रियांनां एक विशेष कर्म आहे व ते म्हणजे वेणीदान होय. नावेंत बसून गंगा यमुनाचे संगमावर जाऊन पतिची आज्ञा घेऊन जीत सुवर्णफुल आहे अशी केसांची वेणी कापून ती गंगेस अर्पण करणें याला वेणीदान म्हणतात. कर्नाटक मद्रास वगैरे कडील स्त्रिया तर सर्व केस दान करतात, म्हणजे पुरुषाचे जसें क्षौर हें गर्व परिहार करणारें आहे तसें वेणीदान हें स्त्रियांचे गर्व परिहार करणारे आहे, स्त्रियानां आपल्या सौंदर्याचा गर्व असतो व तो बहुतेक केसांचे ठेवणीवर फार असतो, हें केंस म्हणजे स्त्रियांचे अत्यंत

आवडते भूषण व ते परमेश्वराला अर्पण करून त्याचे चरणी लीन होणे म्हणजे वेणीदान, विधवा स्त्रियांचे वपन पण याच अर्थानें एक प्रकारचा आत्मयज्ञच आहे. तीर्थांनां गेल्या वेळीं भोगत्याग किंवा चैनीचा त्याग सर्व स्त्री पुरुषांनीं केला पाहिजे. तीर्थयात्रा ह्या परमेश्वर चरणीं लीनता येणे व संसाराचा कंटाळा येणे या दोन उद्देशानें करावयाच्या असतात. व हें उद्देश चैनीचा त्याग केल्यावांचून सिद्धीस जात नाहींत. यासाठीं चैनीचा त्याग करून अनेक कष्ट सोसून तीर्थातीर्थाचे ठिकाणीं जे साधू-वृंद असतात त्यांचे दर्शन घ्यावें. त्यांचे भगवत्प्राप्तीचे मार्ग शिकावे. आपल्या त्या मार्गातील अडचणी त्यांनां विचाराव्या व त्यांचे निवारणाचे मार्ग शिकावे यासाठीं तीर्थयात्रा आहेत. हा तीर्थ यात्रेचा उद्देश बाजूला ठेवून तीर्थावर लाखो रुपये खर्च केलें व ब्राह्मण संतर्पणे घातली तर त्यानी तीर्थयात्रा सफल होणार नाहीं. एक सत्कर्म घडेल पण उद्दिष्ट साध्य होणार नाहीं.

### प्रकरण आठवें

## विधवा

---

नवरा बायकोचा संबंध म्हणजे अतीशय पवित्र संबंध, त्यात यत्किंचित देखील अपवित्रपणा सोसत नाहीं असें एकदां ठरलें म्हणजे नवरा मेल्यावर सर्व संसाराचा वीट येणे अगदीं स्वाभाविक आहे. नवऱ्या साठीं जर आपलें सर्व खेळ तर तो मेल्यावर जगांतील गोडी नाहींशी होणे साहजीकच आहे व असें झालें म्हणजे सती जाणे किंवा संन्यस्त वृत्तीनें रहाणें हें दोनच मार्ग आचरणीय ठरतात, त्यापैकी सती जाणेची माहिती संस्कारांत दिलीच आहे, या ठिकाणीं संन्यस्त वृत्तीनें रहाणेची माहिती द्यावयाची आहे, सर्व विषयोभोगांचा विट आल्यावर अलंकार टाकणें सौंदर्य सोडणें, शरीरशृंगार बंद करणें, चैन टाकणे हें धर्मच होतात,

नवरा हें बंधन सुटून सर्व जग आपले बापभाऊ झाल्यामुळें मंगळसूत्र व बांगड्या या गोष्टी साहजीकच सुटतात. त्या गोष्टींनी दाखविलेले बंधन पाहिलें नाहीं असें यावरून ठरते व स्पष्ट होते. सौंदर्याचा त्याग म्हटला म्हणजे कुंकु, काजळ, केंस वगैरेचा साहजीकच त्याग आला. ज्याच्या साठीं ज्याला प्रसन्न करावयाचे म्हणून नटायाचे तो गेल्यावर नटून करावयाचे काय व या साठीं नवरा गांवास गेला असताना, विटाळशीपणी, बायकांनीं नटूं नये असें शास्त्रकार सांगतात. जी स्थिती दागदागिने वगैरेची तीच सुंदर, रंगीबेरंगी कपडे व त्यांचे नानाविधआकार त्यांबद्दलची चैन टाकणें यांत नानास्वादीष्ट वस्तु खाणें, तेले अंगास लावणें, मऊ हंतरूणावर निजणें, वगैरेचा समावेश होतो. विरहिणी स्त्रीला प्रत्येक भोग हा नवऱ्याची आठवण करून देतो म्हणून त्यापासून तिला सुख होणे तर लांबच राहिले पण अत्यंत वेदना होत असतात. सुंदर चांदणें सुद्धां विरहिणीला झोंबत असते. थोडा काल विरह झालेल्या स्त्रीची जर ही स्थिती तर चिरकाल विरहित राहणारीची काय व्हावी, मनुष्य शरीर किंवा मन दुःखानीं अगर सुखानीं नेहमीं व्याप्त रहाणें शक्य नाहीं म्हणून व्रत घेऊन संगत्याग करावयाचा. विधवांचा धर्म म्हणजे साधे कपडे वापरावे, दागिनें सर्व सोडावे, चैन सोडावी, जीवरक्षणासाठीं अवश्य ते भोग घेऊन आपलें शरीर परोपकारांत झिजवावें व सांपडेल तो वेळ पतिचिंतनांत अगर ईशचिंतनांत घालवावा.

ज्या स्त्रीला तिच्या मनःस्थितीमुळें विधवा व्रतानें वागणें शक्य नसेल तिनें सती जावे असे शास्त्र सांगते. आपल्या विसंगतपणामुळें ही चाल सुटली आहे व सतीचें ऐवजी दुसऱ्याच एक प्रकारच्या स्त्रिया आपणांस दिसतात. यांनां विषयेच्छु स्त्रिया असें मी नांव देतो, कुमारिका व्रत विषयेच्छु स्त्रिया यांत कुंकू हेंच कायते अंतर. सौभाग्यवती व विषयेच्छु स्त्रियांत पण हाच भेद आहे. बाकी त्यांचे पोषाक, रहाणी, खाणे, पिणे एकसारखे असते. अशा स्त्रियांनां 'सकेशा विधवा' म्हणतात पण डोक्या

वर केस असणे व नसणे इतकाच या दोन प्रकारच्या स्त्रियांत भेद नसून वर सांगितल्या प्रमाणें इतर बाबींत पण भेद असतो. विधवा बायका पण हल्ली आपल्या व्रताप्रमाणें न वागणाऱ्या आहेत. पण जेथें सर्व समाजच विस्खलित स्थितींत आहे तेथें व्यक्तिबद्दल चर्चा करणेंत मतलब नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं निराळ्या संस्कृतीशीं संबंध आल्यामुळें आपण भेंडगुजरी झालो आहोंत व ही स्थिती पालटली पाहिजे. मानवीमन फार उच्छृंखल व बलवान् आहे यासाठीं " त्याला होतांहोईतों कह्यांत ठेवावे. ज्याच्या योगानें मन उद्दीपित होईल असें वर्तन कुलस्त्रियांनी करूं नये हें वर निषेध प्रकरणांत नटणें, मुरडणें यांचा विचार करतानां सांगितलें, तीच गोष्ट या विषयेच्छ विधवाबद्दल सांगावयाची, अगोदरच मन उच्छृंखल व त्यांत जर नानाविषय सेवनानें त्याला मदत केली तर ते जास्तच उच्छृंखल होऊन माणसाला खड्यांत पाडील ही गोष्ट आपण नेहमीं डोळ्यापुढें ठेवली पाहिजे. यासाठीं तपोवना सारख्या संस्था निर्माण करून तेथें संन्यासी व संन्यासिनी यांनां मन आवरून लोकोपयोगी कामे कशी करावी याचे शिक्षण दिले पाहिजे. या संस्थांत दहा पांच वर्षे काढल्यावर स्त्रियांनीं उपदेशक वगैरेची कामें करण्यासाठीं बाहेर पडावें. दहा पांच वर्षे तपोवनांत राहिले म्हणजे तेथील वळण लागेल, मन विषयपराङ्मुख होईल व ते आवरतां येईल असे वाटल्यावरच विधवांनीं फिरून गावांत यावे, म्हणजे त्यांचे आयुष्य जनसेवेत जाऊन सार्थकी लागेल. तपोवनाचे दोन भाग अलग असावे एक पुरुषासाठीं व दुसरा स्त्रियासाठीं.

विधवांचा पोषाक साधा असावा म्हणून सांगितलें पण ज्या कारणा साठीं संन्याशांनी भगवेवस्त्र वापरावे त्याच कारणासाठीं स्त्रियांनी पण भगवेच वस्त्र वापरावे किंवा लाल वापरावे. स्वच्छ पांढरा कपडा असला तर तो मळेल ही भीति मनांत रहाते, त्यांत पण एक मोहकपणा आहे, शिवाय इतरानां गृहस्थ व संन्याशी यांचा भेद करून वागणेस अडचण पडते म्हणून मैलखाऊ भगवारंग साधुसंतांनीं व शास्त्रकारांनी पसंत केला

आहे. भगवारंग व राख हें. वैराग्याचें पण द्योतक आहेत. विधवांनी चोळी घालूं नये असें शास्त्र सांगते व बांगड्या, मंगलसूत्र, वगैरे बरोबर चोळी पण सोडणें योग्य दिसते. कित्येक विधवा स्त्रिया हल्लीं चोळी घालू लागल्या आहेत पण पुरुष जसें आतां पूर्वी प्रमाणे उघडे रहाण्यास लाजतात त्यातलाच हा प्रकार आहे. पदर नीट घेतला म्हणजे चोळी न घालतां पण योग्य प्रकारें मर्यादा संभाळतां येते. उगीच कपड्यांत पैसे घालविणेंत मतलब काय? साध्या रितीनें रहावयाचें म्हटलें म्हणजे लज्जारक्षणा पुरतेच कपडे वापरावे हें योग्य. त्यानी अन्नपानाबद्दल सुद्धां हाच नियम ठेवावा. शरीरकर्षण व तप घडावे म्हणून अनेक नियम व व्रतें करावी व नेहमीं मन संतुष्ट ठेवावें. शरीर आहे तो मनुष्य सुखदुःख सम असणे कठीण खरे पण तसा प्रयत्न केला तर तें शक्य आहे. असाध्य गोष्टी साध्य करण्यास नेहमीं नेहमीं तेच करणें हेंच एक साधन आहे. आपण असला नियम नाहीं केला तर मुलें, बाळें, घरांतील लहान थोर मंडळी यांचे आग्रहानें, प्रेमानें वगैरे आपण विषयभोगाकडे वळण्याचा संभव असतो व एकदां या मार्गाकडे वळले म्हणजे त्याचा शेवट येणे कठीण. यासाठींच तर शास्त्रकार सन्यस्तवृत्तीला तपोवनांत जाणेस सांगतात. तपोवनांत सर्वच मंडळी साधेपणे रहात असल्यामुळें मोह उत्पन्न होण्याचे प्रसंगच येत नाहींत व मग मन आवरणे कठीण नसते. खादी वापरण्याचा महात्मागांधीचा उपदेश याच तत्वावर आहे. सर्वच जण खादी वापरूं लागले तर दुसरे कापड घेणेचा मोह उत्पन्न होणेस अवकाशच रहात नाहीं व त्यामुळें ते व्रत सुलभ होतें. तपोवनाचा हा फार मोठा उपयोग आहे व आयुष्याची दोन्ही टोके त्यांत घालविण्यानें ते अवघड होत नाहीं.

या प्रमाणें परोपकार व तपाचरण यांत विधवांनी आयुष्य घालविल्यास त्या फार सन्माननीय होतील व देशांत तेज व सुख वाढेल. संपन्नतेत सुख नाहा कारण संपन्नतेचे शेवट सांपडत नाहीं व यासाठीं वैराग्यच

तरी त्याचे मेलेल्या शरीराला किंवा मढ्याला त्याला जो मान मिळावयाचा तो देत व या प्रमाणें उत्सव व प्रेत संस्कार या दोन बाबी एकदम निर्माण झाल्या. प्रेताला पोरे वगैरे भितील ह्मणून प्रेत संस्कारांत स्रियांचा भाग कमी असे, पण उत्सवांत तो जास्त असे. प्रेत संस्कारानंतर त्या थोर पुरुषाचे स्मरण म्हणून त्याचे नांवानें उत्सव होऊं लागले व त्या उत्सवांत त्यांची गाणी म्हणत. जखमी झालेला वीर घरीं आणल्यावर बरा होईपर्यंत घरांत पडे व मग त्याच्या शुश्रुषेंत स्त्रिया भाग घेत. प्रेत संस्कारांत त्याना भाग कमी होता तो या शुश्रुषेनें भरून निघे. पुरुषाच्या कामांत त्याना घरीं रहाणेस सवड नसल्यानें हें जखमी माणसाची जोपासना करणेचे काम साहजीकपणे बायकांवरच पडे. वरचेवर अशी कामें पडल्यानें जखमी पुरुषाची, आजाऱ्यांची, बाळंतीणीची शुश्रुषा करणेंत व कोणत्या रोगांत कोणते औषध द्यावें या ज्ञानांत बायकांचें पाऊल पुढें पडलें. त्यांच्या दया या गुणाचे यामुळें चांगलेच पोषण झालें. आजाऱ्याचें मन स्वीकारणेस शास्त्र सांगते. तरुणांनी संपन्नतेची इच्छा करावी, तिच्यासाठीं परिश्रम करावें व या प्रमाणें देशाचा व जगाचा अभ्युदय साधावा पण त्यांचे अंतिम ध्येय वैराग्य असावें. वैराग्यसंपन्न माणसांचे त्यानी नेहमीं दर्शन घ्यावे, त्यांनां फार मान द्यावा म्हणजे संपन्नतेचा अभिमान झडतो. सुवासिनी स्त्रियांनी पण विधवा स्त्रियांना फार मान द्यावा, त्यांची शुश्रुषा करावी म्हणजे त्यांचा पण संसारासंबंधी ताठा कमी होतो. निःश्रेयस हे मुख्य व अभ्युदय हें दुय्यम साध्य किंवा ध्येय आहे हें नेहमी लक्षांत ठेवावे, अभ्युदय इच्छिणारांनां विषयांचा उपयोग आहे तर निःश्रेयस इच्छिणारांनां मानसन्मान आहे अशी वाटणी शास्त्रकारांनी केली आहे. एक धनानें संपन्न तर दुसरा विद्येनें संपन्न, एक द्रव्ययज्ञ करणार तर दुसरा तपोयज्ञ करणार, एक अन्नवस्त्र पुरविणार तर दुसरा विद्या व नमुना पुरविणार, एक भोगानें शांत तर दुसरा त्यागानें शांत, एकाचे वैभव नजेरत भरणारे तर दुसऱ्याचें वैभव मनांत भरणारे या प्रमाणें दोन प्रका-

रची ध्येय शास्त्रकारांनीं लोकांपुढें ठेवली आहेत. गुरुसान्निध रहात असतांना लहानपणीं वैराग्याला मान देण्याची संवय लागली म्हणजे मोठेपणीं तारुण्यांत, संपन्न अवस्थेत तो समान साहजीकच रहातो. एकदां जी पूज्य बुद्धि मनांत ठसावते ती कमी होणेस वाव रहात नाहीं फिरून प्रत्येक पुढारी, प्रत्येक थोर गृहस्थ, प्रत्येक संपन्न गृहस्थ फिरून तपोवनांत जात असला ह्मणजे तपोवनांतील संन्माननियांची परंपरा कायम रहाते व त्यांच्या विषयींचा पूज्यभाव केव्हांही कमी होत नाहीं. याप्रमाणें समाजांत अभ्युदय व निःश्रेयस या दोन्ही पुरुषार्थांची सांगड होती म्हणूनच आपलें राष्ट्र वैभवाचे शिखरावर अढळत लपत राहिले होते. ही तपोवनाची संस्था कशी व केव्हां, व कां लयाला गेली हें समजलें तर आपले र्‍हासाचा चांगला उलगडा होईल.

### प्रकरण नववें

## कारभार.

---

अगदीं प्रारंभीं समाज नव्हताच प्रत्येक मनुष्य वाघ किंवा सिंह या प्रमाणें एकटा व स्वच्छंद वागत असे. पण मनुष्य प्राणी इतर प्राण्यांचे मानानें शक्तिनें दुर्बल व युक्तीनें श्रेष्ठ असल्यानें संघ करून राहणारे प्राण्यांकडे पाहून आपण पण संघ करून रहावे असें त्यास वाटलें व या प्रमाणें पहिल्यानें कुटुंब व्यवस्था अमलांत आली. गर्भधारण व बालसंगोपन हें काम स्त्रियानांच करावे लागत असल्यानें घर उत्पन्न होतांच घराचें कारभाराचे दोन तुकडे झाले. बाहेरून अन्नवस्त्र वगैरे मिळवून आणणेचें काम पुरुषाकडे आले व घरीं आणलेल्या जिनसांची योग्य व्यवस्था व जोपासना करणेचें काम स्त्रियांकडे आले व यामुळें स्त्रियांचे अंगीं कारुण्य या गुणाची वाढ झाली पण न्याय या गुणांचा त्यांचे अंगीं अभाव आला. पुरुष बाहेर जात असलेमुळें अनेक पुरुषांशी त्यांचा संबंध येईल व त्यां-

मुळें त्यांच्यात न्यायबुद्धि वाढत गेली पण दया या गुणाची वाढ झाली नाहीं या प्रमाणें समाजाचे अगदीं प्रारंभापासून घरांतील कारभार स्त्रियांकडे आहे व घरांबाहेरील कारभार पुरुषांकडे आहे. समाज हळूहळू सुधारत जाऊं लागला म्हणजे बायकांना फुरसत मिळते व मग बायका बायका एकत्र जमून एकमेकींच्या सुखदुःखाची वाटाघाट होऊं लागते. पण प्रत्येक स्त्री आपले घरची मालकीण असल्यानें, व दुसऱ्या स्त्रियांशी तिचा संबंध फक्त स्नेह संवर्धना पुरताच असल्यानें एकीनें दुसरीचे मतास मान द्यावा. एकमेकींसाठीं एकमेकींनी खपावे हें गुण त्यांत लवकर आले नाहींत. जरा बिनसलें तर निघून आपल्या घरीं जावें व बिनसलेल्या स्त्रीशी संबंध ठेऊं नये असें स्त्रियांना करणें शक्य असे. पुरुषांची गोष्ट अशी नसे. बाहेरून शिकार मिळविणेसाठीं, शत्रूपासून संरक्षण करणें साठीं त्याना जुटीनें रहाणे भाग पडे. असें न केलें तर नुकसान होईल ह्मणून ते जरा पडते घेत. शिवाय त्यांचा पुढारीपण एकाद्या आडदांड माणसाला शिक्षा करून तसें करणे भाग पाडी व यामुळें एकमेकांसाठीं झीज सोसणें, पडते घेणें, वगैरे प्रसंग त्यांजवर येत व या गुणांची त्यांत वाढ झाली. स्त्रिया प्रमाणें ते मत्सरी, एकलकोंड, तुसडे झालें नाहींत.

घरांची योजना झाल्यानंतर उत्सव करणेंत येऊं लागले. मोठी शिकार सांपडली, विजय मिळाला, संकट टळलें ह्मणजे उत्सव करीत. उत्सवांत आरास करणें, सामान गोळा करणें ही कामें पुरुष करीत व त्या साठीं सुग्रास भोजन करणें, पोषाक करणें ही कामे स्त्रिया करीत. उत्सवांत गाणें, नाचणें वगैरे बाबींत सर्वजण भाग घेत, ज्या व्यक्तिनें या विजय वगैरेत प्रमुख भाग घेतला असेल त्याला त्या उत्सवांत नायक समजत. त्याचे गुण वर्णन करणारी गीणीं ह्मणत, त्याला शृंगारीत, असा पराक्रमी पुरुष विजय संपादनांत केव्हां केव्हां मरे व मग तो मेला

रंजनासा... ..गी म्हणण, वाद्य वाजविणें हीं कामें पण त्यांनां चांगली येऊं लागली. हाताचा कोमलपणा, आवाजाचें माधुर्य, गोड भाषण वगैरे गुण या प्रमाणें आनुवंशिक संस्कारानें वाढतां वाढतां आतां स्त्रियांचे नैसर्गिक गुण होऊन बसले आहेत व त्यांनी याच कामामध्यें अजूनही जास्त पुढाकार घेतला तर त्यांत त्यांनां यश खात्रीनें येईल.

उत्सवाचे पुढें अनेक कुटुंबे मिळून एक गांव व पुढें देश असे समाजाचे विस्तारानें मोठे भाग झालें. अशा मोठ्या समाजांत कामाची वाटणी होत गेली तेव्हां घरीं करणेचीं कामें वाढली व कित्येक पुरुष पण या कामांत पडले. उदाहरणार्थ कापड विणणें, शिवणे, सोनारकाम वगैरे कामें घरींच करावयाची असत व यांत पुरुष पडले. दुकान पण याच कामांत येऊं लागले व मग चातुर्वर्ण्य व्यवस्था कामांचे वांटणी प्रमाणें अमलांत आली. समाजातील बाहेरील कामें करणारे लोकांचे क्षत्रिय व शूद्र असे भाग झालें व आंतील काम करणारे लोकांचे ब्राम्हण व वैश्य असें भाग झालें. ब्राम्हण व क्षत्रिय यांचेकडे नियामकत्व व वैश्य व शूद्र यांजकडे हातांनी कामे करणेचीं कामे आलीं. वैश्य जे काम करीत ते विकण्यासारखे जिन्नस असत पण शूद्र जे देश संरक्षणासाठीं लढणें, जनावरांची शुश्रूषा करणें वगैरे करीत या पासून त्याचे पोट भरणेसाठीं वेतन देणे भाग पडे व याप्रमाणें सेवा किंवा वेतन घेऊन काम करणें हें शूद्राचें काम झालें. समाजाचे प्रारंभी ज्यांनां असे वेतन घेऊन कामे करावी लागत अशी माणसे फार थोडी असत. प्रत्येक इसमाला आपली उपजीविका करण्यापुरती जमीन सहज मिळे व त्यावर तो आपले पोट भरी पण पुढें समाज वाढत चालल्यावर जमीनीवर सर्वांचे पोट भरणे कठीण झाले, धंदे पण वाढल्यामुळें धंद्यांची कामें करणेस पुष्कळ माणसे लागू लागली व मग सेवा करणारे माणसांची संख्या वाढली. तथापि अगदीं ज्याला दुसरें उपजीविकेचें साधन नसेल त्यानेंच सेवा करावी असा प्रघात होता व म्हणून सेवावृत्ति हलकी गणलीं आहे.

या नंतर यंत्रांचा प्रसार होऊं लागल्यापासून सेवा करणारे लोकांची व त्याबरोबर संपत्तीच्या विषमतेची भयंकर वाढ झाली व ज्या जगांत पूर्वी सोन्याची भांडी चुलीवर चढत त्याच जगांत सोन्याला नजरे आड करणे अशक्य झालें आहे. याला कोणी सुधारणा ह्मणेल तर ह्मणो पण या विषमतेंत जगाचें कल्याण मात्र खास नाहीं. या एकंदर प्रकारा-कडे व त्यापासून होणाऱ्या नुकसानीकडे पाहिलें म्हणजे यंत्रांनी जगाचा फायदा केला कां नुकसान केले हें ठरविणें कठीण पडते. यंत्रांनी वस्तु चांगल्या निघतात, लवकर निघतात व पुष्कळ निघतात ही गोष्ट खरी व त्यामुळें या वस्तु सर्वांनां सुलभ व्हाव्या असें वाटते. पण प्रत्यक्ष अनुभव मात्र तसा येत नाही. चैनीच्या वस्तु यंत्रांमुळें पुष्कळ व सुलभ झाल्या खऱ्या पण त्यामुळें अवश्य अशा अन्न व वस्त्र या वस्तु कित्येकांनां दुर्मिळ झाल्या आहेत. तात्पर्य यंत्रांमुळें दिखाऊ सुख वाढले पण खरें सुख ज्यापासून समाधान होईल असें सुख अगदीं दुर्मिळ झालें. सुख साधनांची विषमता तर इतकी वाढली कीं संपन्न लोक कित्येकांच्या डोळ्यांत सलूं लागले. पूर्वी सर्वांनां पोट भरून अन्न व अंगभर वस्त्र मिळत असल्यामुळें व साधनांची विषमता फार नसल्यामुळें माणसं एकमेकांशी गुण्यागोविंदानें वागत व सुखानें नांदत. पण हल्लीं अवश्य लागणाऱ्या वस्तु मिळणे कठीण झाल्यानें व अनवश्यक वस्तु फार विषम रितीनें वांटल्यागेल्यामुळें एकमेकांचा हेवा व द्वेष अतीशय वाढला व अराजक वगैरे लोक निर्माण होऊं लागले आहेत. संपन्नतेचे हें दोष लक्षांत आणून आपण वैराग्याकडे वळलें पाहिजे व सर्वांनां सारखे भोग मिळतील अशी तजवीज तटस्थ होऊन केली पाहिजे.

स्त्रियांनी घरचा, उत्सवाचा, गांवचा, देशाचा वगैरे कारभारांत काय भाग घ्यावा हें समजण्यासाठीं हे विवेचन केले आहे. घरांतील सर्व व्यवस्था, व अजाऱ्यांची सेवा वगैरे कामें स्त्रियांचा विशेषच होऊन बसला आहे यासाठीं त्या कामांत त्यांचेच प्रामुख्य असावे. ज्यांनां मुले बाळे

आहेत त्यांनां त्यांचे योग्य संगोपन करणेचे काम पुरेसे आहे. पण मुले बाळे नसलेल्या व विधवा स्त्रियांनीं परोपकाराची, देशसेवेची कामे अंगावर घेतां येण्यासारखी कोणती आहेत ते पुढील प्रकरणांत सांगणार आहेच पण मुख्य लक्षांत ठेवणेची गोष्ट ह्मणजे स्त्रियांत दयागुणाचे प्रामुख्य व न्याय या गुणाची उणीव असल्यामुळें त्या त्या गुणांचाच जेथें उपयोग होईल अशीं कामें त्यांचे वाटणीस आली पाहिजेत, पुष्कळ दिवसांचे आनुवंशिक संस्कार त्या वांचून वाया जातील.

## प्रकरण दहावें

# लोकोपयोगी कामें.

---

वर सृष्टीच्या उत्पत्तीपासून कामांची वाटणी कशी झाली व त्यामुळें स्त्रिया कोणत्या प्रकारची कामें आजपर्यंत करीत आल्या व त्यामुळें त्यांच्या अंगी कोणत्या गुणांची वाढ अनुवंशिक संस्काराने झालेली आहे याचे विवेचन केलेच आहे, आज इतक्या दिवसांच्या संवयीनें अंगी आलेले गुण वाया घालविणे फार गैर आहे, यासाठीं या गुणांनां अनुरूप अशीच कामें त्यांनी अंगावर घ्यावी म्हणजे बरें, माणसाचें गुण हळूहळू पालटतां येतात हें खरें पण ते पालटेपर्यंत पूर्वपरंपरा व नवीन धोरण यांची सांगड घालून आपण वागलो तर आपले इष्ट हेतु चांगल्या प्रकारें सिद्धिस जातात. सगळी समाजाची प्रगति श्रमविभाग व विशिष्टत्व या मुळें झालेली आहे व हल्लींची व्यवस्था पूर्वपरंपरेला धरून आहे. उदाहरणार्थ हल्लींची वारसाची पद्धति स्त्रियांच्या कामाप्रमाणें व त्यांच्या रहाणी प्रमाणें ठरली आहे त्या प्रमाणें सर्व बंधनें पूर्वपरंपरेला धरून आहेत. बापाची मिळकत वगैरे ज्या प्रमाणें मुलास मिळते व मुलीस दुसऱ्याचें घरीं जाऊन तेथें अर्धांगी व मालकीण व्हावें लागते त्याच प्रमाणें बापाचें गुण वगैरें मुलाच्या अंगीं येतात ह्मणून त्यानें बापाचाच धंदा करणें बरें असते,

जो ज्या कामाला योग्य त्याने तें काम केलें म्हणजे समाजाचे हित होते व हें जाणून योग्यतेनुरूप कामांची वांटणी झाली पाहिजे. या तत्त्वाला अनुसरून हल्लींच्या काळच्या परिस्थितींत बायकांना कोणती लोकोपयोगी व देशसेवेची कामें करतां येतील याचें विवेचन खालीं केलें आहे.

स्त्रियांनीच करण्यायोग्य व अत्यंत उपयोगी असें काम म्हणजे सुईणपणा होय, प्रत्येक स्त्रीला बाळंतपण येणार व त्यावेळीं स्त्रीचीच मदत मिळाली पाहिजे, यासाठीं या कामाचें पूर्ण ज्ञान मिळवून हे काम उत्तम प्रकारें करणाऱ्या बायका जितक्या मिळतील तितक्या पाहिजेच आहेत, या बायांनी घरोघर जाऊन अडलेल्या स्त्रियांची फुकटसुद्धां सुटका केली पाहिजे, पूर्वीचें पुरुष प्रेत संस्काराला नाहीं म्हणावयाचें नाहीं असें व्रत धरीत व बायका सुईणपणाला नाहीं म्हणावयाचें नाहा असा नियम करीत, जेवत असतांना जर अशा कामाला आमंत्रण आलें तर जेवण तसेंच थांबवून आंचवायला त्या स्थळीं जाणारी माणसें पूर्वी असत, मनुष्य व पशु यांत जें अंतर आहे तें लोकांनां मदत करण्यांतच आहे, जनावरांपेक्षां माणसांत दया जास्त पाहिजे. अशी मदत करणें म्हणजे लोकांनी आपणावर जें आज तागाईत उपकार केले त्यांची अंशतः फेडच होय. मनुष्य प्राणी फार पंगु आहे पण इतरांच्या मदतीनें त्यानें सगळे जग पादाक्रांत केलें आहे. सृष्टीच्या उत्पत्तीपासून अनेक लोकांनीं ज्या अनेक गोष्टी केल्या व ज्यांचा फायदा आपणांस मिळाला त्या सगळ्यांची शक्त्यनुसार फेड करण्याचा प्रयत्न करणें हें धर्माचें मूलतत्व आहे धृ कर्ज लागणे या धातूपासून या कर्ज फेडीच्या अर्थाचा धर्म हा शब्द उत्पन्न झालेला आहे. यासाठीं ज्यांनां शक्य असेल अशा सर्व स्त्रियांनी हें व्रत घ्यावें, या या साठीं लागणारे ज्ञान व साधनें संपादन करावीत, व आपलें कर्तव्य म्हणून ते पार पाडावें.

अलीकडे सूतिकागृहे स्थापन करण्याकडे लोकांची प्रवृत्ति आहे पण हा कल्पना पाश्चात्य असून ती आपल्या समाजास निरुपयोगी आहे.

यापेक्षां लोकांच्या घरीं जाऊन कामें करणाऱ्या स्वयंसेविकाच पाहिजेत. सूतिकागृहांचा उपयोग आपल्या समाज स्थितीला होत नाही. घरी आपला नवरा, मुलें, संसार उघडा टाकून सूतिकागृहांत जाऊन रहाणें पुष्कळ स्त्रियांनां शक्य नसते. शिवाय सूतिकागृहाची दक्षणा देणे पण कित्येकांनां शक्ति बाहेरचे असते. सूतिकागृहांत एकच प्रकारचे विचार, लोकांच्या नाना बऱ्यावाईट हकीगति व घरच्या नाना विवंचनामुळें सूतिकागृहांत जाणाऱ्या स्त्रियांच्या मनावर अनिष्ट परिणाम होतो. नोकर म्हणून काम करणाऱ्या स्त्रियांच्या हातून काम नीट कसोशिनें होत नाहीं व त्यांनां अनेक कामें असल्यामुळें कामांत हयगय होते. वगैरे अनेक दोष सूतिकागृहांत आहेत, सूतिकागृहाची व्यवस्था पाहूनच इतक्या थाटाशिवाय आपणांस बाळंत होतां येणार नाहीं अशी भलतीच समजूत तेथें जाणाऱ्या स्त्रियांची होते. हिंदी समाज गरीब आहे व या गरीब लोकांनां पैसे घेणाऱ्या स्त्रियांचा उपयोग करणें जड जाते. यासाठीं ज्यांनां ऐपत आहे, पोटापाण्याची अगर संसाराची विवंचना नाहीं त्यांनीं हें देशकार्य अंगावर घेण्यासारखे आहे. पूर्वीच्या कालाप्रमाणें दहा दिवस बाळंतिणीचे सर्व काम फुकट करणाऱ्या बायका तयार झाल्या तर त्यांनी देशाचे एक मोठें काम केलें असें होणार आहे. अशा तऱ्हेच्या स्वयंसेविकांचा एक मठ स्थापन झाला, त्या मठातील स्त्रियांनीं नेहमीं गावांत फिरून जरूर तेथें फुकट काम करण्याचे पत्करलें तर समाज त्यांचा कायमचा ऋणी राहील.

याच्या खालोखाल महत्वाचे काम ह्मणजे स्त्रीशिक्षण, मुलीं करतां शाळा आहेत पण प्रौढ स्त्रियांनां त्यांच्या आळींत जाऊन फुकट शिकविणें त्यांनां ज्ञानाची गोडी लावणें रोजच्या व्यवहारांत त्या ज्ञानाचा उपयोग कसा होतो हें दाखविणें, ही कामें करण्याची फार जरूर आहे. मोठ्या स्त्रियांनां शिक्षण देतानां लहान मुलांचा पण तेथेंच शिक्षणाचा प्रारंभ करतां येईल, या प्रमाणें प्रत्येक गावांत मोहल्यांत, आळीत शिक्षणाचे काम करतानां औषध पाणी देणें, रोग्यांची शुश्रुषा करणें हीं कामें पण

हातां घेतां येतील, हल्लीं पुष्कळ बायकांना देशकार्य करण्याची मोठी हौस आहे व त्यांना हीं कामें सहज साध्य आहेत, श्री समर्थांचे मठ पूर्वी हीं कामें करीत व याच पद्धतीनें घरोबर ओळख पाळख होऊन देश सुधारणेचें काम करतां येते. पाश्चात्यांची समाज रचनाच मूळांत निराळी त्यांचा थाट निराळा, व त्या प्रमाणें कामाचे मार्ग निराळे आहेत. ते आपल्या सारख्या साध्या व गरीब लोकांना उपयोगी नाहींत. फार गुंता-गुंतीची एखादी बाब असली तर तेवढ्या पुरती गोष्ट निराळी.

आजारी पडलेल्या माणसांची शुश्रुषा करण्याचा थोडा उल्लेख वर आलाच आहे. दवाखान्यात पगारी माणसे हें काम हल्लीं करतात पण त्यांचे काम भाडोत्री असते. त्या कामास स्वयंसेविकांच्या कळकळीच्या कामांची जोड पाहिजे आहे. केवळ पंखे उकळण्याकरतां पगारी माणसे आपल्या कामांत हयगय करतात असा अनुभव आहे. ही हयगय भरून काढणें, त्यांच्यानें न होण्याजोगी कामें करणें व इतर सुख साधनें मिळवून रोग्याचें मनरंजन करणें ही कामें विशेषतः बायका व मुलें यासाठीं बायकांनीं करावी. यासाठीं बायका मुलांचें दवाखानें स्वतंत्र व वेगळे असावे. नुसत्या गाण्यानें झोंप लावणं व दुखणे बरें करण्याची विद्या आहे असें शास्त्र सांगते व ही विद्या स्त्रियांनीं संपादन करणें योग्य होईल. तात्पर्य आई प्रमाणें रोग्याचें कष्ट कमी करण्यासाठीं शक्य ते काम स्त्रियांनां करतां येण्यासारखे आहे.

स्वभावतःच सुलभ व प्रत्येक स्त्रीला आवडेल असें काम म्हणजे अनाथ पोरांचे संगोपन होय, प्रत्येक मुलांच्या आया लहानपणीं मरतात व अशा मुलांच्या संगोपनासाठीं नवीन बायको करावी लागते असें सांगतात तर अशा पोरक्या तान्ह्यांचें संगोपन करण्याचें मठ बायकांनीं चालविलें तर त्यांत त्यांचें व त्या मुलांचे पण कल्याणच आहे. असल्या मुलांच्या पोषणासाठीं मठांतच गाई, बकऱ्या वगैरे पाळाव्या म्हणजे दुधाची पण सोय होईल. पांच वर्षांच्या आंतीलच मुलगे येथें ठेवावें व त्या नंतर

त्यांनां मुलांच्या अनाथ गृहांत पाठवावे व मुलींचे निराळे अनाथ विद्यार्थी गृह करण्याचें कारण नाहीं. या मुलांच्या संगोपनासाठीं त्यांच्या वडीलांनीं कांहीं वर्गणी देण्यास सवड ठेवावी व पांच वर्षांनंतर तो मुलगा अगर मुलगी त्यांस घरीं पण घेऊन जाऊं द्यावें म्हणजे मध्यम स्थितींतिल माणसांची एक मोठी सोय होईल. पण कोणी वर्गणी न दिली तरी मठानें त्या मुलांचे संरक्षण करावेच मात्र ती मुलें अशा स्थितींत वडीलांनां मिळणार नाहींत. तसेंच कोणास मूल दत्तक घेणें असल्यास, आपली बेवारसी मिळकत धर्मार्थ देणें असल्यास अशल्या मठानें चांगली सोय होईल. आई ही मुलांनां मोठी आवडती वस्तु व मूल हें प्रौढ स्त्रियांनां आवडणारी जिन्नस असल्यामुळें या योगे दोघांचाही मनोविकास चांगला होण्यास मदत होईल. या प्रमाणें अज्ञान बालकांचे मठ दरएक जिल्ह्यास एकतरी खुशाल चालेल. ज्या बायांनां फार मुलें असल्यानें काम धंदा करण्यास अडचण होते अशा गरीब बायांनीं आपली जरा मोठी मुलें असल्या मठांत खेळण्यास ठेवण्याची सवड ठेवावी. त्यांनीं आपलीं मुलें तेथें ठेवावी व घेऊन जावी असा नियम करण्यास हरकत नाहीं. अशा रितीनें आयांची सोय होईल, मुलांनां सुख लागेल व त्यांनां चांगलें वळण पण लावतां येईल. अशा मुलांच्या खेळण्या व शिकण्यापासून त्यांच्या शरीर प्रकृतीवर पुष्कळ हितकर परिणाम झाल्याचें दिसेल व पुष्कळ शिक्षण व चांगलें वळण गरीबांच्या मुलांनां येथें सहज मिळेल,

या शिवाय बांगड्या भरणें, सूत काढणें, कापड विणणें, कपडे शिवणें, कशीदा काढणें, कुसराईचें काम करणें ही कामें बायकांनां करतां येण्यासारखी आहेत. अशा रितीनें पैसे मिळवून ते धर्मार्थ संस्थेस देणेंच मार्ग पण लोकोपयोगीच आहे, एखाद्या धनिक स्त्रीनें केवळ स्त्रियांसाठींच कारखाना काढणें व स्त्रीयांकडूनच चालविणें तसेच स्त्रियांनां लागणारा माल विकण्याची स्त्रियांनी चालविलेली स्त्रियांसाठींच दुकानें काढणें पण इष्ट आहे. अशा करण्यानें बायकांचा व्यवहार करण्याचा मगदूर वाढेल,

अशा व्यवहाराला वाव मिळेल व योग्यता दिसून आल्यास स्थानिक राजकीय संस्थांत पण स्त्रियांनां भाग मिळणें व घेणें सोईचें होईल. अशा कारखान्यामुळें केवळ स्वयंपाक करणें अगर भीक मागणें भाग पडणाऱ्या पुष्कळ बायकांची सोय होईल. बायकांनीं तयार केलेलेंच कापड किंवा कपडे बायकांनीं वापरावयाचे व आपल्या मायबहीणीस मदत करावयाची असे ह्मटलें तर असल्या कारखान्यास व दुकानास कितीतरी गिऱ्हाईक मिळेल चैनीला गरीबी म्हणून फांटा दिला असल्यामुळें येथें हे उदाहरण घेतलें आहे. बाकी निव्वळ बायकांनाच करतां येऊन देशाचे व समाजाचे हित करतां येईल असे पुष्कळ धंदे सांगतां येतील.

केवळ स्त्रियांनींच चालविल्या धर्मशाळा, सदावर्त, अन्नछत्र; देवालय वगैरेंची पण उणीव आहे. पुरुषांनीं चालविलेल्या या संस्थांत अनीतेचे बोभाटे ऐकूं येतात व या साठीं स्त्रियासाठीं ही कामे स्त्रियांनींच हातीं घेणें वाईट नाहीं. पुष्कळदा धर्मार्थ रकमा स्त्रियांनींच अगर स्त्रियांच्याच स्मरणार्थ देण्यात येतात. असल्या रकमा असल्या केवळ त्यांच्यासाठींच उपयोगी पडणाऱ्या संस्थांत वापरले तर चांगले. आजपर्यंत स्त्रियांनीं घर कारभारच फार केला; त्यांना मोठे कारखानें अगर सार्वजनिक कामे करण्याचे शिक्षण पाहिजे असे पुष्कळदा ऐकूं येते व हे शिक्षण मिळण्यासाठी व मिळून त्याचा उत्तम उपयोग केला असे सिद्ध होण्यासाठी असलीं कामे केवळ स्त्रियांनींच करणे इष्ट आहे. स्त्रियानीं स्त्रियांसाठीच चालविलेल्या बागा व इतर करमणूकींचीं साधनें असणे इष्ट आहे.

स्त्री वपुरूप अशा मिश्र समाजात अनीतिचा फार बोभाटा होतो या साठीं बायका तयार होण्यास बायकांनीच काढलेले उद्योग वगैरे उपयोगी पडतील, आगगाडी वगैरेंवर तिकीटें देणेस स्त्री; त्यांचे जाण्यायेण्याचे रस्ते व बसण्याची जागा पडदपोशीची त्यांस अन्नपाणी वगैरेची चांगली व्यवस्था या गोष्टी पण होणें जरूर आहे तात्पर्य बायकांची लाज; विनय मर्यादा वगैरे राहून त्यास सुखसोयी मिळाव्या व त्यांची व्यवस्था ठेवण्याचे शिक्षण मिळुन कामे करण्यास वाव मिळावा असे झाले पाहिजे.

या शिवाय लढाई वगैरे टिकाणीं जखमी झालेलें सैनिक यांनां मलमपट्टी करणें, त्यांची शुश्रुषा करणें हींही कामें स्त्रियांनीं केली पाहिजेत. वीरांनां प्रोत्साहन देणें, त्यांस देशकार्यें करण्यास उत्तेजण देणें, व त्यांचें हाल अपेक्षा कमी करण्यास झटणें ही कामें बायकांनी करण्यासारखीं आहेत. शास्त्रीय शोध, आकाशस्थ ज्योतींची माहिती वगैरे कामें पण कांहीं स्त्रियांनां करतां येतील. तात्पर्य पुरुषांशीं स्पर्धा न करतां पण स्वतःच्या कर्तबगारीनें जगांत नांव मिळविण्यास त्यांनां योग्य तो अवसर मिळाला पाहिजे. पुरुष करतात ती सर्व कामें स्त्रिया करूं शकतील पण मग त्यांत इतक्या दिवसांचा आनुवंशिक संस्कार फुकट जातो व मग स्त्रियांचे स्त्रीपण रहात नाहीं, स्त्री व पुरुष यांचें मिश्र समाज दोघांनांही घातक होतात असा आजपर्यंतचा अनुभव आहे. ज्ञानी पुरुष सुद्धां स्त्रियांच्या सहवासांत धैर्यभ्रष्ट झाल्याशिवाय रहात नाहींत. अगदीं अलीकडचे या बाबींचे मोठे उदाहरण रशियाचे आहे. गेल्या महायुद्धांत या बाबीत पुष्कळ चमत्कारिक अनुभव आले. पहिल्यानें जर्मन सैनिक बेल्जीअममध्यें शिरलें तेव्हां त्यांनीं बेल्जन स्त्रियांवर जुलूम केल्याची ओरड ऐकूं आली. पण पुढें इंग्लंड फ्रान्स देशांत सैन्यांच्या मोठमोठ्या छावण्या पडल्या तशा त्यांपासून पण पुष्कळ अनीति मूलक संतती उत्पन्न झालेली दिसली तेव्हां हा बोभाटा आपोआप बंद झाला लष्करी थाटाला भुलून पुष्कळ स्त्रियांनीं या शिपाई गड्यांनां आत्मसमर्पण केल्याचें दिसले. रशियन लोकांनीं बायकांचीं पलटणेंच उभारलीं होती व ती आपआपल्या जिल्ह्यांत उत्तम कामें करीत. पण रणांगणावर स्त्री पुरुष पलटणें एकत्र मिसळल्यावर दोघांचेंही शौर्य व धैर्य, व वीर्य नाहींसे झालें. लढण्या ऐवजी ही पलटणे रंगांतच दंग झाली व अखेर स्त्रियांचीं पलटणें मोडून टाकणें भाग पडले. इतर ठिकाणीं स्त्रियांची पलटणें रणांगणावर गेलीच नाहींत.

हिंदी शास्त्रकारांचे याबाबद जे ह्मणणे आहे ते खरे आहे.

तप्तांगार समानारि, घृतकुंभसमःपुमान् ॥
तस्मात घृतंच वान्हिंच नैकत्रस्थापयेत बुधः ॥
बलवानिंद्रियग्रामा विद्वांसमपिकर्षति ॥

स्त्री ही पेटलेल्या विस्तवाप्रमाणे असून पुरूष हा तुप भरलेल्या मडक्या प्रमाणें आहे यासाठी शहाण्या माणसानें हा विस्तव व हे तूप एकत्र ठेवूं नये. इंद्रिये फार जोरदार आहेत ती शहाण्या माणसालापण भलतीचकडे आढून नेतात. कालांतराने या मनोवृत्तींत फरक पडेल, स्त्रिया व पुरुष एकमेकांशीं निर्विकार मनानें मिसळू शकतील पण तसे होईपर्यंत निदान आपण सावधगिरी ठेवली पाहिजे. चौऱ्यायशी लक्ष योनीतील खोड दहा वीस जन्मांत जाणे शक्य नाहीं. धोक्यात जाऊन पस्तावण्यापेक्षां सावधगिरीने धोका टाळणेच श्रेयस्कर. ज्या ठिकाणी धोका स्वीकारण्या शिवाय मार्ग नाहीं तेथें सुद्धां धोका न होण्याची जितकी खबरदारी घेता येईल तितकी घ्यावी. या बेतानेंच वर स्त्रिधर्माची, शिक्षणाची, व त्यांच्या कामांची मांडणी केली आहे. हळूहळू जग चांगल्याकडेच जात असते पण अद्याप ते पूर्ण झालेले नाहीं व अपूर्ण जगांत धोका आहे हें आपण विसरतां कामा नये. वाईटाने वाईट व चांगल्यानें चांगले वाढत जातें यासाठीं नेहमीं चांगले करण्याकडे प्रवृत्ती ठेवावी ह्मणजे अखेर तो जगन्नियंता कल्याणच करील.

॥ कायम्या पामरे बोलावी उत्तरे ॥
॥ परित्या विश्वंभरे बोलविली ॥ १ ॥
जयजय रघुवीर समर्थ

## समाप्त.

